
श्रीचैतन्य महाप्रभू, श्रीनित्यानंद प्रभू, श्रीअद्वैत आचार्य, श्रीगदाधर पंडित, श्रीवास प्रभू आणि गौर-भक्त-वृंद


श्रील जगन्नाथ दास बाबाजी महाराज


श्रील भक्तिविनोद ठाकुर


श्रील गौरकिशोरदास बाबाजी महाराज


श्रील भक्तिसिद्धान्त सरस्वती ठाकुर प्रभुपाद


श्रीश्रीमद् भक्तिरक्षक श्रीधर गोस्वामी महाराज


श्रीश्रीमद् भक्तिप्रज्ञान केशव गोस्वामी महाराज


श्रीश्रीमद् भक्तिप्रमोद पुरी गोस्वामी महाराज


श्रीश्रीमद् भक्तिवेदान्त स्वामी महाराज


श्रीश्रीमद् भक्तिवेदान्त वामन गोस्वामी महाराज


श्रीश्रीमद् भक्तिवेदान्त त्रिविक्रम गोस्वामी महाराज


श्रीश्रीमद् भक्तिवेदान्त नारायण गोस्वामी महाराज


हरि-नाम-माहात्म्य शिक्षा-गुरू श्रीश्रीमद् अनिरुद्ध प्रभू


श्रीश्रीमद् गौर-गोविन्द स्वामी महाराज

# श्रीब्रह्म-माध्व-गौडीय वैष्णव गुरु-परंपरा

॥श्रीगुरु–गौरांगौ–जयतः ॥

# श्रीमद्भगवद्गीता–सार

**श्री गौडीय वेदान्त समिति आणि त्याच्या अंतर्गत भारतव्यापी श्रीगौडीय मठांचे संस्थापक, श्रीकृष्णचैतन्याम्नाय दशमाधस्तनवर श्रीगौडीयाचार्यकेशरी नित्यलीलाप्रविष्ट ॐ विष्णुपाद अष्टोत्तरशत श्रीश्रीमद्भक्तिप्रज्ञान केशव गोस्वामी महाराज यांचे अनुगृहीत**

**त्रिदंडि–स्वामी श्रीश्रीमद्भक्तिवेदान्त नारायण गोस्वामी महाराजांच्या श्रीमुखातून निःसृत (प्रवाहित) झालेल्या अमृतमय वाणीतून संकलित**




*श्रीभक्तिप्रज्ञान गौडीय वेदान्त विद्यापीठ प्रकाशन, हेसरकट्टा,*
*बंगळूर–५६००८८, कर्नाटक*

**प्रकाशकः** डॉ. श्रीपाद भक्तिवेदान्त दंडी महाराज, हेसरकट्टा, बंगळूर–५६००८८

**आपल्या परम कल्याणाकरिता खालील महामंत्राचा सदैव जप करा**
**हरे कृष्ण हरे कृष्ण कृष्ण कृष्ण हरे हरे।**
**हरे राम हरे राम राम राम हरे हरे॥**

श्रील गुरुदेवांचे प्राणधन श्रीश्रीराधा–विनोदबिहारी आपला कृपामय तिरक्या कटाक्ष आणि मंद मनोहर हास्य घेऊन श्रीरंगनाथ गौडीय मठ, नृत्य–ग्रामाच्या जवळ, हेसरकट्टा, बंगळूर–५६००८८ येथे विहार करतात. ते आपल्यावर अहेतुक कृपेची वृष्टी करण्याकरिता आतूर आहेत. आपण सपरिवार येऊन आमच्या मोफत कार्यक्रमांचा जरूर लाभ घ्यावा.

## दैनिक कार्यक्रम

प्रातःकालीन मंगल आरती– प्रातःकाळी ५ वाजता
संध्याकाळची आरती आणि प्रवचन– सकाळी ७ ते ८.३० पर्यंत

## साप्ताहिक कार्यक्रम

***प्रत्येक रविवारी***

भजन, कीर्तन, प्रवचन व प्रसाद
दुपारी ११.३० ते २ वाजेपर्यंत

***प्रत्येक शनिवारी***

संध्याकाळी ५ वाजता नगर–संकीर्तन

## दर एकादशीचा कार्यक्रम

रात्री ९ वाजल्यापासून दुसऱ्या दिवशी पहाटे मंगल–आरतीपर्यंत

***नाम–संकीर्तन आणि हरिकथा***

आपल्या जिज्ञासेच्या समाधानासाठी आणि आपल्या आध्यात्मिक प्रश्नांच्या उत्तरांसाठी संपर्क कराः

**श्रीपाद भक्तिवेदान्त दंडी महाराज**
दूरध्वनी–८०९५२४०३८७, ९३७९४४७८९५
ई–पत्र– bvdandi@gmail.com

## महाराष्ट्रातील प्रचार-केंद्र

श्रीरंगनाथ गौडीय मठ आणि गोशाळा, मुक्कामः गाडेवाडी, पोस्टः बोरीबेल, तालुकाः दौंड, जिल्हाः पुणे

*जर आपल्याला आपल्या गावातील मंदिरात किंवा स्वतःच्या घरी श्रीमद्भगवद्गीता, श्रीमद्भागवत किंवा एकादशी माहात्म्य या विषयांवर विनामूल्य प्रवचन आयोजित करायचे असेल तर आमच्याशी खालील दूरध्वनी क्रमांकांवर संपर्क साधण्याची कृपा करावी. आम्ही गावोगावी जाऊन हरिनामसंकीर्तन व प्रवचन करण्याची इच्छा बाळगतो.*

श्रीपाद जमदग्नी प्रभू (दूरध्वनी-९८५०५१९९०४)
श्रीपाद हरिदास प्रभू (दूरध्वनी-९७६६३३०२०३)

‘श्रीमद्भगवद्गीता सार’ या ग्रंथाच्या मराठी आवृत्तीच्या प्रकाशनासाठी खालील भक्तांनी सहाय्यता दिली. आम्ही त्यांचे आभारी आहोत—

**श्रीमान विलास विठ्ठल बर्वे, बीए (ऑनर्स), एलएलएम**
**श्रीपाद राधाशरण प्रभू (दौंड)**



| | |
|---|---|
| अनुवादिकाः | श्रीमती माया सुधाकर बनकर (यशोदा-देवी-दासी) |
| संशोधनः | श्रीपाद भक्तिवेदान्त विष्णुदैवत स्वामी<br>बी.ई., एम.टेक. (आय.आय.टी., खरगपूर) |
| दूरध्वनीः | ९०२१६२५२२८, ८२७५८४४६६७, ०८९४१०८४८७४ |
| ई-पत्रः | vd108108108@gmail.com, ekadasifoundation@gmail.com |

संकेत-स्थळे

https://madhavatithi.blogspot.com/
www.purebhakti.com
www.purebhakti.tv
bhaktiprojects.org/project/sri-ranganatha-gaudiya-matha-gurukula

# अनुक्रमणिका

# प्रकाशकीय वक्तव्य

'श्रीमद्भगवद्गीता सार' नामक हा ग्रंथ आमच्या प्रिय वाचकांसमोर प्रस्तुत करतांना मला अपार हर्ष होत आहे. हा ग्रंथ परमाराध्यतम गुरूदेव ॐ विष्णुपाद परमहंस परिव्राजकाचार्य अष्टोत्तरशत श्रीश्रीमद्भक्तिवेदान्त नारायण गोस्वामी महाराज यांच्याद्वारे श्रीमद्भगवद्गीतेवर दिलेल्या प्रवचनांवर आधारित आहे. श्रील गुरुदेवांनी शुद्ध-भक्तीच्या मार्ग-प्रदर्शक रूप बंगाली आणि संस्कृत भाषेतल्या अनेकानेक ग्रंथांचा हिंदी अनुवाद व्याख्येसहित प्रकाशित केला आहे. अधिकांश ग्रंथ आकाराने मोठे आणि विषयाने अत्यंत गंभीर असल्याने सामान्य जनांना या ग्रंथांचे तात्पर्य ग्रहण करणे (समजणे) सहज शक्य नाही आहे. सामान्य लोकांवर कृपा करण्याच्या उद्देशाने श्रील गुरुदेवांनी आपल्या विभिन्न विषयांवर दिलेल्या प्रवचनांना आधार बनवून छोट्या आकाराचे ग्रंथ प्रकाशित करण्याची अनुमती प्रदान केली आहे. या शृंखलेतील 'श्रीमद्भगवद्गीता सार' हा प्रथम ग्रंथ आहे. गीतेचे मर्म सर्वसाधारण जनतेला सरळ आणि सहजसोप्या रूपात बोधगम्य बनविण्यासाठी हा ग्रंथ प्रकाशित करण्याची आवश्यकता अनुभवली गेली. श्रील गुरुदेवांच्या चरणकमळी हेच विनम्र निवेदन आहे की त्यांनी या हीनदीनावर आपल्या अहेतुक कृपेचा वर्षाव करावा, जेणेकरून अधिकाधिक ग्रंथांचे प्रकाशन शक्य होऊ शकेल.

मुद्रण-कार्यातील शीघ्रतेमुळे ग्रंथात जर काही त्रुटी-विच्युती निदर्शनास आल्या तर सज्जन वाचक निजगुणांनी क्षमा करतील आणि संशोधन करून ग्रंथांचे सार ग्रहण करतील.

*श्रीश्रीगुरुकृपालेश-प्रार्थी हीनदीन*
*गोकुलचंद्र दास*

# प्रस्तावना

श्रीमद्भगवद्गीतेला गीतोपनिषद म्हटले गेले आहे. हे समग्र वैदिक ज्ञानाचे सार आहे आणि वैदिक साहित्यातील सर्वाधिक महत्त्वपूर्ण उपनिषद आहे. जे लोक साधू, गुरू आणि वैष्णवांच्या चरणांचा आश्रय श्रद्धापूर्वक ग्रहण करून या ग्रंथाचे अनुशीलन करतील, ते विनासायासच यथार्थ तात्पर्य ग्रहण करू शकतील. ते सहज-सरळ रूपाने भवसागर पार करतील. श्रीकृष्णांच्या चरणकमळांची पराभक्ती (सर्वोत्तम भक्ती) प्राप्त करून कृष्ण-प्रेमाचे अधिकारी बनू शकतील —यात किंचितही संशय नाही आहे.

आजकाल भारतातील मोठमोठे मनीषिगण (बुद्धिमान लोक) तसेच प्रवीण व्यक्ती या ग्रंथाचा आदर करतांना दिसतात. इतकेच काय की सर्व संप्रदायातील लोक या ग्रंथराजाच्या प्रती आदर आणि श्रद्धाभाव प्रदर्शित करतात. बऱ्याचशा प्रसिद्ध राजनैतिक व्यक्तींनी देखील या ग्रंथाप्रती श्रद्धा प्रकाशित केली आहे. जगातल्या सगळया देशांतील चिंतक आणि विचारक (मनीषी) व्यक्तींनी सुद्धा या ग्रंथाची भरपूर प्रशंसा केली आहे.

श्रीगीताशास्त्राच्या वाचकांना दोन भागांत विभक्त केले जाऊ शकते, स्थूलदर्शी आणि सूक्ष्मदर्शी. स्थूलदर्शी वाचक केवळ वाक्यांचे बाह्यार्थच (फक्त वरवरचा अर्थ) ग्रहण करून सिद्धांत निर्माण करतात. परंतु सूक्ष्मदर्शी वाचकगण शास्त्राच्या बाह्यार्थाने संतुष्ट न होता गंभीर तात्त्विक अर्थाचा शोध घेतात. स्थूलदर्शी वाचकगण सुरुवातीपासून शेवटपर्यंत गीतेचे पठण करून हा सिद्धांत ग्रहण करतात की 'कर्म'च गीतेचा प्रतिपाद्य विषय आहे, कारण अर्जुनाने संपूर्ण गीता ऐकून शेवटी युद्ध करणेच श्रेयस्कर समजले.

सूक्ष्मदर्शी वाचकगण तशा स्थूल सिद्धांताने संतुष्ट होत नाहीत. ते एकतर ब्रह्मज्ञानाला अथवा पराभक्तीलाच (उत्तमा-भक्तीलाच) गीतेचे तात्पर्य मानतात. त्यांचे म्हणणे असे आहे की 'अर्जुनाचे युद्ध अंगिकारणे' हे अधिकार-निष्ठेचे उदाहरण मात्र आहे, ते गीतेचे अंतिम तात्पर्य नव्हे.

श्रीमद्भगवद्गीतेचे तात्पर्य अर्थात तिच्या अंतिम प्रतिपाद्य विषयाला समजण्याकरिता तिच्या वक्त्याद्वारे दिलेल्या निर्देशांना (सूचनांना) ग्रहण करायला हवे. गीतेचे वक्ता स्वयं-भगवान श्रीकृष्ण आहेत. गीतेच्या प्रत्येक पृष्ठात त्यांचा उल्लेख भगवंतांच्या रूपात झाला आहे. श्रीकृष्णांनी स्वतः अहैतुकी कृपावशतः अनेक स्थळी स्वतःला परात्पर तत्त्व 'भगवान' म्हणून संबोधले आहे—

**‘अहं सर्वस्य प्रभवो मत्तः सर्वं प्रवर्त्तते।**
**इति मत्वा भजन्ते मां बुधा भावसमन्विताः॥’**

*(गीता १०/८)*

“मी सर्वांच्या उत्पत्तीचे कारण आहे, माझ्या मुळेच सर्वजण कार्यात प्रवृत्त होतात—अशा प्रकारे समजून पंडितगण भावयुक्त होऊन माझे भजन करतात.”

**‘मत्तः परतरं नान्यत् किञ्चिदस्ति धनञ्जय।**
**मयि सर्वमिदं प्रोतं सूत्रे मणिगणा इव॥’**

*(गीता ७/७)*

“हे धनंजय! अन्य कुणीही माझ्यापेक्षा श्रेष्ठ नाही, धाग्यात मण्यांप्रमाणे हे संपूर्ण जगत माझ्यात ओवलेले आहे.”

**'अहं हि सर्वयज्ञानां भोक्ता च प्रभुरेव च।**
**न तु मामभिजानन्ति तत्त्वेनातश्च्यवन्ति ते॥'**

*(गीता ९/२४)*

“कारण मीच समस्त यज्ञांचा भोक्ता आणि प्रभू आहे, परंतु ते लोक मला स्वरूपतः जाणत नाहीत, म्हणून ते संसारात प्रत्यावर्तन करतात (भौतिक जगात परत जन्म घेतात).”

अन्यान्य भगवदवतारांनी आपल्या भगवत्तेचा स्पष्ट परिचय स्वतः दिला नाही, परंतु गीतेत भगवान श्रीकृष्णांनी स्वतःच सुस्पष्ट रूपाने आपल्या भगवत्तेचा परिचय देऊन आपली ‘शरणागती’ आणि ‘भक्ती’ यांनाच जिवांसाठी सर्वोत्तम साधन म्हणून निर्दिष्ट केले आहे (दर्शविले आहे). भक्तीच गीतेचा चरम (सर्वोच्च) प्रतिपाद्य विषय आहे, याला स्वतः श्रीकृष्णांनीच प्रतिपादित केले आहे.भगवान श्रीकृष्णांनी परतत्त्व निर्णयाच्या संबंधात ब्रह्मज्ञानाला ‘गुह्य’, परमात्म–ज्ञानाला ‘गुह्यतर’ आणि पराभक्तीला ‘सर्व–गुह्यतम’ म्हटले आहे. हाच गीता–शास्त्राचा यथार्थ समन्वय आहे.

ग्रंथाचा इंग्रजी भाषेतून अनुवाद आणि प्रूफ संशोधनाच्या कामात कन्या श्रीमती जानकी दासी, कंप्यूटरवर कंपोजिंग आणि लेआऊटकरिता श्रीमान गोकुलचंद्र दास, प्रूफ संशोधनाकरिता श्रीओमप्रकाश ब्रजवासी तसेच संपादन कामाकरिता श्रीपाद भक्तिवेदान्त माधव महाराज यांचे सेवाकार्य प्रशंसनीय आहे. ग्रंथासाठी चित्रे प्रस्तुत करण्याकरिता श्रीमती श्यामराणी दासी यांचे सेवाकार्य प्रशंसनीय आहे. विशेषतः ग्रंथ प्रकाशनाच्या संपूर्ण आर्थिक सेवानुकूल्यासाठी श्रीमान संजय जैन आंतरिक धन्यवादाचे पात्र आहेत. श्रीश्रीगुरू–गौरांग–गांधर्विका–गिरिधारी या सर्वांवर प्रचुर

कृपाशीर्वाद करोत.

शेवटी भगवत्करुणेचे घनविग्रह परमाराध्यतम श्रीगुरुपादपद्म नित्यलीला प्रविष्ट ॐ विष्णुपाद अष्टोत्तरशत श्रीश्रीमद्भक्तिप्रज्ञान केशव गोस्वामी महाराज माझ्या प्रती प्रचुर कृपाशीर्वादाचा वर्षाव करोत, जेणेकरून मी हीनदीन सेवक त्यांच्या मनोऽभीष्ट सेवेत अधिकाधिक अधिकार प्राप्त करू शकेल, हीच त्यांच्या चरणी सकातर प्रार्थना आहे.

| | |
|---|---|
| श्री गिरिधारी गौडीय मठ,<br>गोवर्धन, जिल्हा मथुरा<br>(उत्तर प्रदेश)<br>अन्नकूट महोत्सव<br>२ नोव्हेंबर २००५ | *श्रीहरि–गुरु–वैष्णव–कृपालेश–प्रार्थी*<br>*हीनदीन*<br>*त्रिदंडि–भिक्षू*<br>**श्रीभक्तिवेदान्त नारायण** |



**हरे कृष्ण हरे कृष्ण**

**कृष्ण कृष्ण हरे हरे।**

**हरे राम हरे राम**

**राम राम हरे हरे॥**

साधकांनी कधीही आपल्या स्वातंत्र्याचा गैरवापर करून मनमान्या कार्यांत संलग्न होऊ नये. त्यांनी भगवंतांच्या निर्देशानुसारच ‘मी कर्ता व भोक्ता आहे’—या अभिमानाचा परित्याग करून सेवकाच्या रूपात कर्मांमध्ये प्रवृत्त व्हायला हवे. भगवंतांचा हा निर्देश चैत्य गुरूच्या रूपात भगवंतांपासून अथवा भगवत्–कथित शास्त्रांतून प्राप्त करायला हवा अथवा भक्तांच्या निर्देशांनाच भगवंतांचा निर्देश मानून समस्त कार्यांना भगवंतांच्या सेवेच्या उद्देशाने करणे उचित आहे. भगवत्–निर्देशाच्या विपरीत कर्मांचा कर्ता आणि फळांचा भोक्ता बनून कर्म केल्याने जन्मजन्मांतरी त्यांच्या चांगल्या व वाईट फळांना भोगण्यासाठी बाध्य व्हावे लागते.

# पहिला परिच्छेद

## *महाभारत युद्धाची पृष्ठभूमी*

कुरुवंशाचे महाराज शांतनूंची पत्नी गंगादेवींच्या गर्भातून भीष्मांचा जन्म झाला होता, परंतु बालकाच्या जन्मानंतर कुण्या विशेष कारणास्तव त्या अंतर्हित (गुप्त) झाल्या. महाराज शांतनू एकदा शिकार करायला गेले असताना निषादराजांच्या घरी एक अपूर्व रूपवती राजकन्या सत्यवतीला त्यांनी पाहिले. महाराजांनी निषादराजांकडून आपल्या विवाहासाठी त्या राजकन्येला मागणी घातली. परंतु निषादराजांनी विवाहासाठी एक अट ठेवली की सत्यवतीचा पुत्रच राजा होईल. महाराजांनी हे स्वीकार केले नाही आणि ते राजधानीला परतले. ही गोष्ट कोण्याप्रकारे युवराज भीष्मांच्या कानावर पडली आणि त्यांनी ही भीषण प्रतिज्ञा केली की सत्यवतींचा पुत्रच राजा होईल आणि मी आजीवन ब्रह्मचर्य व्रताचे पालन करीन. अशा प्रकारे त्यांनी सत्यवतीचा विवाह आपले पिता शांतनू यांच्यासोबत करविला. अशा भीषण प्रतिज्ञेमुळे यांच्या वडिलांनी यांना इच्छा मृत्यूचे वरदान दिले.

सत्यवतींच्या गर्भातून महाराज शांतनूंना दोन पुत्र झाले—चित्रांगद आणि विचित्रवीर्य. महाराज शांतनूंच्या मृत्यूनंतर चित्रांगद राजा बनले, परंतु त्यांच्या अकाली मृत्यूनंतर विचित्रवीर्यांना राज्यपद दिले गेले. त्यांच्या दोन पत्न्या (बायका) होत्या— अंबिका आणि अंबालिका. परंतु निःसंतान दशेत विचित्रवीर्यांचा देखील अकाली मृत्यू झाला. पुत्रांच्या शोकामूळे माता सत्यवती फारच दुःखी झाल्या. त्यांनी वंशाच्या रक्षणासाठी आपले प्रथम पुत्र महर्षी वेदव्यासांचे स्मरण केले. वेदव्यासांनी माता सत्यवतीची आज्ञा आणि भीष्मांचे अनुमोदन जाणून विचित्रवीर्यांची पत्नी अंबिकेपासून धृतराष्ट्र, अंबालिकेपासून महाराज पांडू आणि त्यांच्या दासीच्या गर्भातून महात्मा विदुरांना उत्पन्न केले.

धृतराष्ट्र जन्मापासून आंधळे असल्यामुळे पांडूच राजसिंहासनावर बसले. महाराज पांडूंना पाच पुत्र झाले. त्यांच्यातील ज्येष्ठ पुत्राचे नाव युधिष्ठिर होते. धृतराष्ट्रांच्या शंभर पुत्रांमध्ये दुर्योधन सर्वात मोठा होता. कालाच्या गतीमुळे राजकुमार कमी वयाचे असतानाच महाराज पांडूंचा मृत्यू झाला. म्हणून भीष्म पितामहांनी राजकुमार मोठे होईपर्यंत धृतराष्ट्रांनाच राज्य–संरक्षकाच्या रूपात राजसिंहासनाचे दायित्व सोपविले. जेव्हा पाचही पांडव आणि धृतराष्ट्रांचे दुर्योधन इत्यादी पुत्र युवावस्थेला प्राप्त झाले, तेव्हा राज्यगादीचा प्रश्न उठला.

महाराज धृतराष्ट्र आपल्या पुत्रांच्या प्रती पक्षपाती होते. ते कपटता आणि बळाच्या जोरावर दुर्योधनालाच राज्यपदापर अभिषिक्त करू इच्छित होते. परंतु भीष्म पितामहांसारख्या परम धार्मिक, पूज्य व्यक्ती आणि प्रजाजनांच्या दबावामुळे ते असे करू शकले नाहीत. त्यांनी बाह्यरूपात युधिष्ठिरांना अर्ध्या राज्याच्या राजाच्या रूपात नवनिर्मित वारणावत नगरात पाठवून त्यांना जाळून मारण्याचे षड्यंत्र रचले, परंतु पांडव कसेतरी वाचले.

याच्या काही काळानंतर पांडवांचा द्रौपदींशी विवाह झाला. पांडव अजून जीवित आहेत, असे जाणून भीष्म पितामहांच्या आदेशानुसार त्यांना इंद्रप्रस्थ नामक स्थानाचे राजत्व सोपविले. पांडवांनी तेथे श्रीकृष्णांच्या मदतीने मयदानवाच्या द्वारा एका अद्भुत सुंदर नगरी आणि राजभवनाचे निर्माण करविले. काही दिवसांतच पांडवांनी भारतवर्षातील मोठमोठ्या राजांना जिंकून एका ‘महाराजसूय’ यज्ञाचे अनुष्ठान केले.

महाराज धृतराष्ट्र आणि दुर्योधन आदी पांडवांचा राजसूय–यज्ञ पाहून आणि त्याबद्दल ऐकून ईर्षेने जळू लागले. त्यांनी परत षडयंत्र रचून कपटतापूर्वक द्यूतक्रीडेत (जुगारात) पांडवांचे राज्य हिरावून घेतले आणि त्यांना बारा वर्षांचा वनवास आणि एक वर्षाच्या अज्ञातवासासाठी बाध्य केले. परंतु तो काळ पूर्ण झाल्यावर देखील पांडवांना त्यांचे राज्य परतविले गेले नाही. इतरांची तर गोष्टच काय, भगवान श्रीकृष्ण देखील पांडवांचे दूत बनून हस्तिनापुरला गेले, परंतु दुर्योधन आपल्या हट्टावर अडून राहिला. त्याने पाच गावांची तर गोष्टच काय, युद्ध केल्याशिवाय सुईच्या टोकावर मावेल एवढीसुद्धा जमीन देणे अस्वीकार केले. म्हणून युद्ध आवश्यक झाले. धर्माची स्थापना, साधूंचे रक्षण आणि दुष्टांचे दमन करण्यासाठीच भगवान श्रीकृष्णांचा आविर्भाव झाला होता. त्यांनी या महाभारत युद्धाद्वारे अर्जुन आणि भीमांना निमित्त बनवून पृथ्वीचा भार काही अंशात हरण केला.

## *युद्धस्थल कुरुक्षेत्र का?*

व्यासदेवांनी युद्धस्थल कुरुक्षेत्राला धर्मक्षेत्र म्हटले आहे.

**धृतराष्ट्र उवाच–**
**धर्मक्षेत्रे कुरुक्षेत्रे समवेता युयुत्सवः।**
**मामकाः पाण्डवाश्चैव किमकुर्वत सञ्जय॥**

"धृतराष्ट्र म्हणाले-हे संजय! धर्मभूमिस्वरूप कुरुक्षेत्रात माझे पुत्र आणि पांडुपुत्रांनी युद्धाच्या इच्छेने एकत्रित झाल्यावर काय केले?"

श्रीमद्भागवत (९/२२/४) च्या अनुसार कुरुराजांच्या नावानुसार या क्षेत्राचे नाव 'कुरुक्षेत्र' पडले आहे.

**योऽजमीढसुतो ह्यन्य ऋक्षः संवरणस्ततः।**
**तपत्यां सूर्यकन्यायां कुरुक्षेत्रपतिः कुरुः॥**

"अजमीढच्या दुसऱ्या पुत्राचे नाव ऋक्ष होते. ऋक्षापासून संवरणाने जन्म घेतला. संवरणाचा विवाह सूर्य-कन्या तपतीशी झाला तपतीच्या गर्भातूनच त्या कुरूंचा जन्म झाला, जे कुरुक्षेत्राचे राजा बनले."

महाभारतात शल्यपर्वाच्या अनुसार महाराज कुरू एकदा या क्षेत्रात नांगराने जमिनीची मशागत करित होते, त्यावेळी देवराज इंद्र उपस्थित झाले आणि त्यांनी विचारले, "तुम्ही असे का करत आहात?" कुरुराजांनी उत्तर दिले—"माझी इच्छा आहे की जे लोक या क्षेत्रात देहत्याग करतील, त्यांना स्वर्गलोकाची प्राप्ती व्हावी." हे ऐकून देवराजांनी त्यांचा उपहास केला आणि ते स्वर्गलोकात परतले. महाराज कुरू पुन्हा मोठ्या उत्साहाने नांगर चालवू लागले. इंद्र पुन्हापुन्हा त्यांच्या जवळ येऊन त्यांचा उपहास करायचे आणि निघून जायचे. शेवटी अन्य देवतांच्या सल्ल्याने देवराजांनी प्रसन्न होऊन कुरुराजांना हा वर दिला की जे लोक या क्षेत्रात देहत्याग करतील अथवा युद्धात मारले जातील त्यांना अवश्यच स्वर्गाची प्राप्ती होईल.

जावालोपनिषद (१/२) मध्ये देखील कुरुक्षेत्राला देवतांचे यज्ञस्थळ आणि सर्व प्राण्यांसाठी यज्ञाचे स्थान म्हटले गेले आहे. येथे यज्ञ केल्याने स्वर्गलोक आणि बह्मलोकाची प्राप्ती होते. सत्पथ ब्राह्मणात देखील **'कुरुक्षेत्रं देवयजनमास। तस्मादाहुः कुरुक्षेत्रं देवयजनम्'** असे म्हटले गेले आहे. म्हणून युद्धासाठी या धर्मक्षेत्राची निवड करण्यात आली.

'धर्मक्षेत्र' या शब्दात 'धर्म' आणि 'क्षेत्र'—ही दोन पदे आहेत. येथे 'क्षेत्र' पदाने 'शेता'चा बोध होतो. ज्या प्रकारे शेतकरी धानाच्या (भाताच्या) शेतात जलसिंचनाद्वारे धानाची शेती करतो, परंतु धानाच्या रोपट्यांसोबत एक प्रकारचे गवत (तण) उगवते—त्या गवताला 'श्यामा गवत' म्हणतात. हे गवत दिसायला ठीक धानाच्या रोपट्यांसारखेच (पिकासारखेच) असते. सिंचनाच्या पाण्याला स्वतः ग्रहण करून हे गवत धानाच्या रोपट्यांना झाकून स्वतः वाढू

लागते. धानाची रोपटी हळूहळू सुकू लागतात. म्हणून कुशल शेतकरी त्या धान्य–विरोधी गवताला समूळ उखडून फेकतो. त्याच प्रकारे भगवान श्रीकृष्णांनी या क्षेत्रात धर्म–विरोधी, धर्माभास, अधार्मिक दुर्योधन आदींचा संहार करून मूर्तिमंत धर्मस्वरूप सपरिवार युधिष्ठिर आदींचे पालन–पोषण केले होते.

सरस्वती आणि दृषद्वती नदींच्या मध्यवर्ती क्षेत्राला कुरुक्षेत्र म्हणतात. ही महर्षी मुद्गल आणि महाराज पृथूंची तपस्यास्थली आहे. परशुरामांनी क्षत्रियांचा विनाश केल्यानंतर याच क्षेत्राच्या अंतर्गत पाच स्थानांवर यज्ञ केला होता. म्हणून या स्थानाला पहिले 'स्यमंत–पंचक' क्षेत्र म्हटले जात असे. नंतर महाराज कुरूंच्या नावानुसार हे क्षेत्र कुरुक्षेत्राच्या नामाने प्रसिद्ध झाले.



# दुसरा परिच्छेद

अठरा अध्यायांत संपूर्ण असलेल्या गीतेच्या पहिल्या सहा अध्यायांमध्ये कर्मयोग, अंतिम सहा अध्यायांमध्ये ज्ञानयोग आणि मधील सहा अध्यायांमध्ये भक्तियोगाचे स्वरूप-वैशिष्ट्य प्रतिपादित केले गेले आहे. याचे कारण हे आहे की भक्ती मध्यभागी अवस्थित (विद्यमान, उपस्थित) राहून कर्म आणि ज्ञान—या दोघांनाही आपला आश्रय प्रदान करते, कारण भक्तिदेवीच्या सहाकार्याशिवाय कर्म आणि ज्ञान आपले कोणतेही फळ प्रदान करू शकत नाहीत. भक्तीच्या मदतीनेच दोन्ही फळे प्रदान करण्यास समर्थ होतात.

## *कर्म*

भगवान श्रीकृष्णांनी स्वतःच अर्जुनांना कर्माच्या संबंधी उपदेश दिला आहे की भगवंतांना प्रसन्न करण्यासाठी (त्यांना आनंद प्रदान करण्यासाठी) कर्म करणे उचित आहे. अन्यथा ती कर्मेच मनुष्यासाठी बंधनाचे कारण बनतात. जसे—**'यज्ञार्थात् कर्मणोऽन्यत्र लोकोऽयं कर्मबन्धनः'** (गीता ३/९) येथे 'यज्ञार्थात्' शब्दाचा आशय आहे विष्णूंसाठी अर्पित. म्हणून विष्णूंच्या संतुष्टीसाठीच (आनंदासाठीच) कर्म केले जावे, कारण श्रीकृष्ण म्हणतात—**'भोक्तारं यज्ञतपसां'** (गीता ५/२९). आणखी देखील ते म्हणतात—**'मयि सर्वाणि कर्माणि संन्यस्य'** (गीता ३/३०) अर्थात समस्त कर्मे मला समर्पित करूनच करायला हवीत. पुन्हा 'यत्करोषि' श्लोकाद्वारे श्रीकृष्ण म्हणतात—जे काही तुम्ही करता, माझ्या प्रसन्नतेसाठीच करा, मलाच अर्पित करा. अशा प्रकारे आम्ही पाहातो की श्रीकृष्णांनी कर्माधिकारी जीवांसाठी निष्काम भगवदर्पित कर्म करण्याचाच उपदेश दिला आहे, फक्त कर्म करण्याचा नाही.

साधारणतः भक्तिसहित कर्मच 'कर्म' शब्दाने अभिहित होते (संबोधिले जाते) ज्या कर्मात भक्तीचे प्राधान्य असते, ते कर्म भक्तीच्या अधीन असते, त्याला कर्ममिश्रा भक्ती किंवा प्रधानीभूता भक्ती म्हणतात. ज्या कर्मांचे उद्देश्य भगवंतांची प्रीती (आनंद) असतो—तेच यथार्थतः कर्म आहे—**'तत्कर्म हरि तोषणं यत्'** (श्रीमद्भागवत ४/२९/४९) म्हणून गीते (११/५५) मध्ये देखील असे म्हटले आहे—**'मत्कर्मकृन्मत्परमो मद्भक्तः सङ्गवर्जितः। निर्वैरः सर्वभूतेषु यः स मामेति पाण्डव'** म्हणजे जे माझ्या प्रितीच्या (संतुष्टीच्या) उद्देशाने कर्म करतात—तेच मला प्राप्त करतात.

## *ज्ञान*

श्रीकृष्णांनी भगवंतांच्या प्रती शरणागत आर्त, जिज्ञासू, अर्थाथी आणि ज्ञानींमध्ये ज्ञानींनाच सर्वश्रेष्ठ म्हटले आहेत. ते ज्ञानी कसे असतात—**'तेषां ज्ञानी नित्ययुक्त एकभक्तिर्विशिष्यते'** (गीता ७/१७) अर्थात ते ज्ञानी ऐकान्तिकी भक्ती असणारे आणि नित्ययुक्त असतात; भक्तिरहित निर्विशेष बह्मवादी ज्ञानीचे येथे काही तात्पर्य नाही आहे. म्हणून पुढे गीते (७/१९) मध्ये आपली गोष्ट आणखी स्पष्ट करताना श्रीकृष्ण म्हणतात—**'बहूनां जन्मनामन्ते ज्ञानवान्मां प्रपद्यते'** म्हणजे जे सर्वत्रच वासुदेवांचे दर्शन करतात, माझ्या शरणागत होतात आणि भक्तीत स्थिरचित्त असणारे असतात—असे परम ज्ञानी–भक्त सुदुर्लभ (अतिशय दुर्मीळ) आहेत. भक्तिप्राधान्यहीन ज्ञानच 'ज्ञान' शब्द वाच्य आहे. जे ज्ञान प्रेमभक्तीच्या प्रती अभिमुख असते, त्याला ज्ञानमिश्रा भक्ती म्हणतात आणि काही दूर अग्रेसर झाल्यावर, प्रेमाची प्रचुरता आल्यावर जेव्हा ज्ञान निरस्त (रद्द) होऊन जाते, तेव्हा विशुद्ध केवलाभक्ती किंवा प्रेमाभक्ती प्रकाशित होते.

## *योग*

भगवंतांनी सहाव्या अध्यायाच्या शेवटी योगीची विशेषरूपाने प्रशंसा केली आहे, त्यांनी कर्मी, तपस्वी आणि ज्ञानीपेक्षाही त्याला श्रेष्ठ ठरविले आहे. अर्जुनांना योगी बनण्याचा उपदेश दिला आहे —**'तपस्विभ्योऽधिको योगी'** (गीता ६/४६), परंतु पुढच्या श्लोकातच भगवंत म्हणतात, कसा योगी—**'योगिनामपि सर्वेषां मद्गतेनान्तरात्मना'** (गीता ६/४७) म्हणजे समस्त प्रकारच्या योगींमध्ये ते योगीच सर्वश्रेष्ठ आहेत, जे अन्तरात्म्याने—हृदयाने श्रद्धापूर्वक सदैव माझे भजन करतात. येथे 'माझे' चे तात्पर्य स्वतः श्रीकृष्णांशी आहे. म्हणून जे योगी सर्व प्रकारे श्रीकृष्णांचेच भजन करतात, तेच गीतेमध्ये कथित 'योगी' शब्दवाच्य आहेत. येथे योगाचे तात्पर्य पातंजल–योग इत्यादी नाही आहे, तसेच भक्तिरहित कर्मी, योगी, तपस्वी किंवा निरीश्वर योगी सुद्धा नाही आहे.

## *भक्ती*

विश्वरूपाचे दर्शन केल्यानंतर श्रीकृष्णांनी भक्त अर्जुनांना लक्ष्य करून म्हटले—'भक्त्या त्वनन्यया शक्यो अहमेवंविधोऽर्जुन' (गीता ११/५४). म्हणजे अनन्या भक्तीच्या द्वारेच माझ्या या स्वरूपाचे

दर्शन संभव आहे, तुम्ही अनन्य प्रेमीभक्त आहात, म्हणून तुम्ही माझ्या या स्वरूपाचे दर्शन केले. आणखी देखील—'भक्त्या मामभिजानाति' (१८/५५) म्हणजे केवळ अनन्य भक्तीद्वारेच कोणी माझे दर्शन करू शकतो, मला तत्त्वतः जाणू शकतो आणि माझ्या धामात प्रवेश करून माझी प्रेममयी सेवा प्राप्त करू शकतो.

गीतेच्या उपसंहारात श्रीकृष्णांनी गुह्य बह्मज्ञान, गुह्यतर परमात्म किंवा ईश्वरज्ञान आणि सर्वात शेवटी सर्वगुह्यतम भगवत्-ज्ञानाचा उपदेश देत म्हटले आहे—'सर्वधर्मान् परित्यज्य मामेकं शरणं व्रज' या श्लोकात श्रीकृष्णांनी अर्जुनाला सर्व लौकिक धर्मांचा त्याग करून आपल्याप्रती शरणागत होण्याचा उपदेश दिला आहे. याच्याद्वारे हे प्रतिपादित होते की भक्तीच भगवत्-प्राप्तीचा एकमात्र उपाय आहे. भक्तीच्या द्वारेच भगवंतांच्या पूर्ण-स्वरूपाची उपलब्धी संभव आहे. **ही भक्ती दोन प्रकारची असते—(१) केवला आणि (२) प्रधानीभूता.** (१) केवला—कर्म, ज्ञान आदींच्या गंधाने रहित संपूर्ण स्वतंत्र असते. (२) प्रधानीभूता तीन प्रकारची असते—(क) कर्मप्रधानीभूता, (ख) ज्ञानप्रधानीभूता आणि (ग) कर्मज्ञानप्रधानीभूता. ज्या कर्म किंवा ज्ञानात भक्तीची प्रधानता असते, कर्म व ज्ञान तिच्या अधीन असतात, तिला प्रधानीभूता भक्ती म्हणतात. ज्या कर्म किंवा ज्ञानात भक्तिवृत्तीची प्रधानता नसते, त्याच कर्माचे नाम कर्म आणि त्याच ज्ञानाचे नाम ज्ञान असते.

गीता शास्त्रात जेथे-तेथे प्रधानीभूताचा उपदेश असूनही त्यामध्ये केवला भक्तीच्या प्रती इंगित अवश्यच लक्षित होते (अंतस्थ हेतू अवश्यच दिसून येतो). परंतु प्रधानीभूता भक्तीच्या द्वारे भगवंतांना जाणणे किंवा प्राप्त करणे सुदुर्लभ आहे. 'एकमात्र अनन्या किंवा केवला भक्तीद्वारेच मी सुलभ आहे'—याला स्पष्टरूपाने व्यक्त करण्यासाठीच श्रीकृष्णांनी पुढे आणखी सुस्पष्टरूपात उल्लेख केला आहे—**'अनन्यचेताः सततं यो मां स्मरति नित्यशः। तस्याहं सुलभः पार्थ नित्ययुक्तस्य योगिनः॥'** (गीता ८/१४) म्हणजे अनन्या भक्तीने युक्त जे लोक माझे सदैव स्मरण करतात, माझे भजन करतात, अशा नित्य योगींसाठी मी सुलभ आहे. केवळ हेच नाही, अनन्या भक्तिसंपन्न भक्तांच्या ऐकान्तिकी प्रेममयी सेवेद्वारे भगवान कसे वशीभूत होतात, याला देखील व्यक्त करीत आहेत —**'अनन्याश्चिन्तयन्तो मां ये जनाः पर्युपासते। तेषां नित्याभियुक्तानां योगक्षेमं वहाम्यहम्॥'** (गीता ९/२२) म्हणजे जे लोक अनन्य भावाने सर्व प्रकारे माझी उपासना करतात, तशा सदैव भक्तीमध्ये

तत्पर भक्तांचा योग-क्षेम मी स्वतःच वहन करतो (वाहतो).

गीतेमध्ये जागोजागी भगवान श्रीकृष्णांनी हाच उपदेश दिला आहे की केवळ अनन्या भक्तीद्वारेच कोणी मला प्राप्त कर शकते —**'भक्त्या लभ्यस्त्वनन्यया'** (गीता ८/२२), **'भजन्त्यनन्यमनसः'** (गीता ९/१३), **'भक्त्या त्वनन्यया शक्यो'** (गीता ११/५४) आणि सर्वात शेवटी—**'सर्वधर्मान् परित्यज्य मामेकं शरणं व्रज। अहं त्वां सर्वपापेभ्यो मोक्षयिष्यामि मा शुचः॥'** (गीता १८/६६). अशा प्रकारे विशुद्धा, अनन्या किंवा केवला भक्तीच जीवांसाठी परम तात्पर्य आहे.

या अनन्या भक्तीचे अनुष्ठान कसे करायला हवे—या विषयीदेखील अर्जुनांना उपदेश दिला गेला आहे—**'सततं कीर्त्तयन्तो मां यतन्तश्च दृढव्रताः। नमस्यन्तश्च मां भक्त्या नित्ययुक्ता उपासते॥'** (गीता ९/१४). या श्लोकाद्वारे श्रीकृष्णांनी संकीर्तनालाच आपली श्रेष्ठ उपासना म्हटले आहे. येथे भगवन्नाम, रूप, गुण, लीला इत्यादींचे उच्च स्वरातल्या कीर्तन करण्यालाच संकीर्तन म्हटले आहे. याच्या द्वारा नवधा भक्तीलाच लक्ष्य केले गेले आहे.

बरेचसे लोक जडविद्येच्या द्वारे गीतेला समजण्याची आणि समजविण्याची धृष्टता (दुःसाहस) करतात. परंतु, ते हे जाणत नाहीत की गीता अप्राकृत वस्तू आहे, हे जडीय ज्ञान, तर्क आणि बुद्धीच्या अतीत आहे. येथे दांभिकता, शूरता, वीरता आणि पांडित्य पोहोचू शकत नाहीत. एकमात्र शरणागतीच्या माध्यमातून भगवंतांच्या कृपेद्वारेच त्यांना जाणले जाऊ शकते. म्हणून श्रुतींनी म्हटले आहे —**'नायं आत्मा प्रवचनेन लभ्यो'** (मुंडक उपनिषद २/३/३) आणि **'तेषां सततयुक्तानां भजतां प्रीतिपूर्वकम्। ददामि बुद्धियोगं तं येन मामुपयान्ति ते॥'** (गीता १०/१०) म्हणजे निरंतर माझ्या भक्तीद्वारे माझ्याशी युक्त साधकांना मी बुद्धियोग प्रदान करतो, ज्याद्वारे ते मला सहजच प्राप्त होतात.

कोणत्याही ग्रंथाच्या तात्पर्याचा निर्णय करते वेळी उपक्रम, उपसंहार, अभ्यास, अपूर्वता फळ, अर्थवाद आणि उपपत्तीचा विचार करणे आवश्यक आहे. यांच्याशिवाय ग्रंथाच्या यथार्थ तात्पर्याचा निर्णय होत नाही.

जे लोक या सहा अंगांना ध्यानात ठेवून श्रीगीता-शास्त्राचा विचार करतील, ते विनायासासच समजू शकतील की शुद्धा भक्तीच गीतेचे एकमात्र परम तात्पर्य आहे. आजकाल साधारण लोक

शास्त्राच्या या अंगांचा विचार केल्याशिवाय स्वार्थ सिद्धीसाठी मनात येईल त्या (मनमान्या) पद्धतीने शास्त्राच्या तात्पर्याचा निर्णय करतात. याच्या द्वारे ग्रंथकारांचे मूळ तात्पर्य चांगल्या रितीने समजता येत नाही.

आजकाल असे प्रचलन पाहिले जाते की ज्ञान, विज्ञान, राजनीती आणि इतर विषयांमध्ये तारतम्यमूलक विचार तर केला जातो परंतु धर्माच्या विषयात कोणीही लेखक किंवा वक्ता तारतम्यमूलक विचार करण्यास मागेपुढे पाहातात (किंवा संकोच करतात). ते असे समजतात की धर्माच्या विषयात उच्च-नीच अशा तारतम्याचा विचार केल्याने सांप्रदायिक तणाव किंवा विवाद उत्पन्न होईल. अशा प्रकारे समाजात अशांती पसरेल. केवळ एवढेच नाही, धार्मिक विवादांमुळे सामाजिक आणि जागतिक उन्नतीत बाधा उपस्थित होईल. म्हणून सर्व लोकांमध्ये साम्य आणि मैत्रीची स्थापनेसाठी धर्माच्या विषयात तारतम्य प्रदर्शनाच्या बदल्यात सर्वांमध्ये समन्वय करण्याची विशेष आवश्यकता आहे. म्हणून सर्वधर्म-समन्वयानेच शांती आणि परस्पर बंधुत्वाची स्थापना संभव आहे. राजनैतिक क्षेत्र आदींमध्ये परस्पर नीतींच्या तारतम्यमूलक वैशिष्ट्य प्रदर्शनामुळेच राजनैतिक भांडणे होतात आणि त्याच्याद्वारे सर्व प्रकारे समाज आणि राष्ट्राचे अहित होते. म्हणून धर्माच्या संबंधात देखील उच्च-नीच तारतम्यमूलक विचाराच्या प्रदर्शनाने सांप्रदायिक भांडणे होतात.

या अवस्थेत आमचे हे वक्तव्य आहे की जसे ज्ञान आणि धर्माच्या विषयात तारतम्यमूलक विचाराची आवश्यकता आहे, त्याच प्रकारे समन्वयमूलक विचार देखील विचार मार्गाचा प्रधान विषय आहे. समन्वय कशाला म्हणतात? जर समन्वय करतेवेळी आम्ही चांगले-वाईट, सचेतन (ज्याला चेतना आहे)-अचेतन (ज्याला चेतना नाही), हिरा-कोळसा, चोर-साधू, न्याय-अन्याय सर्वांना एकाच तराजूत तोलले, सर्व एकच आहे—असे म्हटले, तर मग विचार राहिला कुठे? ही तर निव्वळ अज्ञानता आहे, याला समन्वय म्हणता येत नाही. 'समन्वय'—'सम्यक्-अन्वय' म्हणजे चांगल्या, उपयुक्त अन्वयाला समन्वय म्हणतात. जर वाक्यांमध्ये समन्वय करायचा असेल, तर कर्ता, कर्म, क्रियेच्या पदांचा उपयुक्त स्थानांमध्ये सन्निवेश करावा लागेल. असे न केल्याने कर्त्याच्या स्थानी क्रिया, क्रियेच्या स्थानी कर्म आणि कर्माच्या स्थानी दुसरे पद

बसविल्याने यथार्थ अन्वय होत नाही. जर अन्वयच झाला नाही, तर समन्वय कसा होईल? उचित समन्वयाद्वारेच यथार्थ संगती, मिलन आणि अविरोध साधित होतात. परंतु, यथार्थ समन्वयाच्या बदल्यात गुण आणि दोषाचा, योग्यता आणि अयोग्यतेचा विचार न करून सर्वांना एकाच आसनावर बसविणे समन्वय नाही आहे. कोणीही असंतुष्ट होऊ नये, म्हणून कसेबसे सर्वांना संतुष्ट ठेवणे, सर्वांना एक समान सांगणे, यथार्थ समन्वय नव्हे. **To please everybody is to please nobody.** (सगळयानाच संतुष्ट करणे म्हणजे कोणालाच संतुष्ट न करणेच समजावे.)

आजकाल काही तथाकथित समन्वयवादी लोक गीतेमध्ये उपदिष्ट कर्म, ज्ञान, योग आणि भक्ती—सर्वांना एक दाखविण्याचा प्रयास करतात. परंतु, भगवंतांनी गीतेमध्ये स्पष्टरूपाने कर्मापेक्षा ज्ञान, ज्ञानापेक्षा योग आणि योगापेक्षा भक्तीच्या श्रेष्ठतेचे प्रतिपादन केले आहे. मायामुग्ध जीवांसाठी सकाम सत्कर्म, त्याच्यापेक्षा वरच्या स्तरावरील लोकांसाठी निष्काम भगवदर्पित कर्म, त्याच्यापेक्षाही उन्नत साधकांसाठी तत्त्वज्ञान आणि शेवटी शुद्ध भगवद्भक्तीला श्रेष्ठ म्हटले आहे. भक्तीच गीतेचा परम प्रतिपाद्य विषय आहे. याला स्वतः श्रीकृष्णांनीच प्रतिपादित केले आहे. गीतेचा हाच समन्वय आहे. भगवत्–कथित विज्ञानसम्मत तारतम्यमूलक समन्वयवादाला सोडून ससीम बुद्धीद्वारे वेगळयारीतीने गीतेचा समन्वय शोधणे हा मूर्खतेचा परिचय आहे. भगवान श्रीकृष्णांनी परतत्त्व निर्णयाच्या संबंधात बह्मज्ञानाला गुह्य, परमात्मज्ञानाला गुह्यतर आणि पराभक्तीला सर्वगुह्यतम म्हटले आहे. हाच गीता शास्त्राचा यथार्थ समन्वय आहे.

काही आधुनिक व्याख्याकार देवीदेवतांची आराधना आणि श्रीभगवंतांच्या आराधनेला एकच मानतात. परंतु, गीतेमध्ये अन्यान्य(इतर) देवतांच्या पूजेला **'येऽप्यन्यदेवताभक्ता यजन्ते श्रद्धयान्विताः। तेऽपि मामेव कौन्तेय यजन्त्यविधिपूर्वकम्'** (गीता ९/२३) श्लोकाच्या द्वारे अविधिपूर्वक सांगितले गेले आहे. देवदेवतांची पूजा करणारे देवलोकाला प्राप्त करून भोगांना भोगल्यानंतर पुन्हा वापस येतात. परंतु भगवत्–आराधक (भगवंतांचे उपासक) भगवत्–धामात प्रेममयी सेवा प्राप्त करून तेथून कधीही पतित होत नाहीत. शास्त्रात हा स्पष्ट उल्लेख आहे—जे लोक श्रीनारायण आणि रूद्र आदी देवतांना एकच समान समजतात, ते पाखंडी आहेत, ते नरकाला प्राप्त होतात—**'यस्तु नारायणं देवं रुद्रादि दैवतम् ब्रह्म–रुद्रादि दैवतैः। समत्वेनैव विक्षेत स पाषण्डी**

**भवेद् ध्रुवम्॥'** (पद्मपुराण)

**अर्चे विष्णौ शिलाधीर्गुरुषु नरमतिर्वैष्णवे जातिबुद्धि–**
**र्विष्णोर्वा वैष्णवानां कलिमलमथने पादतीर्थेऽम्बुबुद्धिः**
**श्रीविष्णोर्नाम्नि मंत्रे सकलकलुषहे शब्दसामान्यबुद्धि**
**विष्णौ सर्वेश्वरेशे तदितर–समधीर्यस्य वा नारकी सः॥**

"श्रीदाक्षिणात्य पंडित म्हणतात—ज्या व्यक्तीची भगवत्–प्रतिमेत साधारण–शिला–बुद्धी, श्रीगुरुदेवांत साधारण–नर–बुद्धी, वैष्णवांत जाति–बुद्धी, विष्णू अथवा वैष्णवांच्या कलिमलनाशक चरणामृतात साधारण–जल–बुद्धी, समस्त पापनाशक भगवंतांच्या नामरूप मंत्रात सामान्य–शब्द–बुद्धी आणि सर्वेश्वरेश्वर भगवान विष्णूंमध्ये अन्य देवतांमध्ये समान बुद्धी आहे, ते निश्चितच नारकी जीव आहेत."

काही लोक गीतेच्या **'ये यथा मां प्रपद्यन्ते तांस्तथैव भजाम्यहम्'** (गीता ४/११) श्लोकाची अत्यंत चुकीची व्याख्या करतात. या श्लोकाच्या द्वारे ते हे सांगू इच्छितात की जे लोक कशीही आराधना का न करोत, ते सर्व शेवटी एकाच धामात पोहोचतील. मार्ग अनेक आहेत, परंतु सर्वांचे गंतव्य स्थळ एकच आहे. परंतु, विशेषरूपाने विचार केल्यावर याचे तात्पर्य तसे प्रतीत होत नाही. याचे तात्पर्य हे आहे की ज्याची माझ्याप्रती जशी शरणागती आहे, त्याच तारतम्यानुसार मी त्याला तसेच फळ प्रदान करतो. जसे कर्म, तसे फळ. म्हणून सर्व एकच आहेत, हे कसे शक्य आहे? जो अप्रपन्न आहे आणि जो प्रपन्न (शरणागत) आहे, दोघांचे फळ एक आहे—गीतेच्या ह्या श्लोकात किंवा अन्य कोण्या श्लोकात असे म्हटले नाही आहे.

द्वितीयतः जे लोक भगवंतांचा आश्रय ग्रहण करतात, त्या सर्वांचे उद्देश्य एक नसते. कर्मी विषयभोग–फलाच्या कामनेने, ज्ञानी मुक्तीसाठी, योगी सिद्धीच्या प्राप्तीसाठी आणि भगवद्भक्त भगवंतांच्या ऐकान्तिकी प्रेममयी सेवा प्राप्तीच्या उद्देशाने भगवंतांचा आश्रय ग्रहण करतात. या सर्वांची कामना, साधना आणि उद्देश्य वेगवेगळे असते. म्हणून हे सर्व एकच फळ प्राप्त करतील, हे असंभव (अशक्य) आहे. अधिकांश लोक उपरोक्त श्लोकाचे द्वितीय चरण वाचून ही चुकीची धारणा करून घेतात की सारे मनुष्य सर्व प्रकारे भगवत्–प्राप्तीच्या मार्गावरच अग्रेसर होत आहेत. असे मानल्याने असेही मानावे लागेल की चोर, डाकू, गुंडे, व्यभिचारी—हे सर्व भगवत्–प्राप्तीच्या मार्गावरच चालले आहेत? काय असे मानणे उचित

आहे? नाही, कदापि नाही. या श्लोकाचे यथार्थ तात्पर्य हे आहे की कर्म, ज्ञान, योग आणि भक्ती भगवंतांच्या द्वारा सांगितलेले मार्ग आहेत. लोक योग्यतेनुसार जश्या मार्गाचे अनुसरण करतील, तसेच फळ प्राप्त करतील, साधनाच्या भेदाने फळाचा भेद अवश्यच स्वीकार करावा लागेल. बौद्ध, शांकर, जैन, शैव, शाक्त आणि वैष्णवांचे विचार आणि साधनेत स्पष्टच भेद आहे. अशा दशेत हे म्हणणे की हे सर्व एकच फळ प्राप्त करतील, सर्वांची एकच गती होईल—हा विचार युक्तिसंगत नव्हे. हे सर्व वेगवेगळया कामनांच्या प्राप्तीसाठी वेगवेगळया साधनांचे अवलंबन करतात. शून्यवादी बौद्ध निर्वाण किंवा शून्यात मिळू इच्छितात. अद्वैतवादी ब्रह्मसायुज्याची कामना करतात, शाक्त विषय भोगाची कामना करतात, शैव मोक्षाच्या कामनेने सोऽहं किंवा शिवोऽहं होण्याची कृती करतात. परत बौद्ध वेद मानत नाहीत, अद्वैतवादी वेदालाच अपौरुषेय मानतात, शाक्त महामायेला आद्याशक्ती मानतात, परंतु शैव उमापती शिवांनाच परतत्त्व मानतात. यांचे विचार भिन्न-भिन्न आहेत, साधनदेखील भिन्न-भिन्न आहेत, उद्देश्य देखील वेगवेगळे आणि आराध्य देखील वेगवेगळे आहेत. म्हणून हे सर्व एकच फळ प्राप्त करतील, असे म्हणणे मूर्खतेच्या अतिरिक्त आणखी काय असू शकते? हा गीतासंमत विचार नाही आहे.



# तिसरा परिच्छेद

## *श्रीमद्भगवद्गीतेच्या समस्त अध्यायांचा सारांश*

**प्रथम अध्याय**—श्रीमद्भगवद्गीतेमध्ये १८ अध्याय आहेत. प्रत्येक अध्यायाचे तात्पर्य भक्तीतच पर्यवसित होते. देहात्मबुद्धी असणाऱ्या लोकांच्या मनोधर्मातून उत्पन्न देहधर्म, कुलधर्म, जातिधर्म इत्यादी जिवांचा सनातन आत्मधर्म नाही आहेत—हे सांगण्यासाठीच पहिल्या अध्यायात अर्जुनांनी युद्धक्षेत्रात 'विषादग्रस्त होण्याचा अभिनय' केला. जो पर्यंत जीव मायेत आबद्ध राहून देहाला आत्मा समजतो, तो पर्यंत तो शोक, मोह, भय इत्यादी नाना प्रकारचे क्लेश भोगण्यास आणि दुःखमय होण्यासाठी बाध्य आहे. म्हणून त्याला तत्त्वविद् गुरूंना शरण जाणे आवश्यक आहे.

**दुसरा अध्याय**—या अध्यायात हे निर्धारित झाले आहे की यथार्थ सद्गुरूंचा आश्रय ग्रहण केल्यावर जीव आपल्या अज्ञानतेची अनुभूती करतो. आपल्या स्वतंत्र विचारांना सोडून भ्रम, प्रमाद आदी दोषांनी रहित तत्त्वदर्शी, ऐकान्तिक, प्रेमी भक्त श्रीगुरुदेवांच्या विचारांना शिरोधार्य करून मायेच्या मोहजालातून सुटका प्राप्त करण्याची कृती करतो. त्या वेळी तो श्रीगुरुदेवांच्या कृपेने त्यांच्या मुखारविंदातून निःसृत उपदेशांना श्रवण करून जडदेह आणि आत्म्याच्या पार्थक्याचे ज्ञान प्राप्त करतो. सोबतच विषयभोगाचा दुष्परिणाम जाणून, स्थितप्रज्ञ मुनींचा विचार, लक्षण आणि त्यांचा महिमा आदी ऐकून आकृष्ट होतो. त्यानंतर साधुसंग प्राप्त करून त्यांच्या हृदयात तत्त्वज्ञान प्राप्त करण्याची जिज्ञासा अंकुरित होते.

**तृतीय अध्याय**—श्रीकृष्णांच्या उपदेशांना श्रवण करून जीव अशा स्थितीत पोहोचतो, जेथे तो हे समजू शकतो की श्रीभगवंतांच्या सेवेसाठी निष्काम भावाने आपल्या सर्व कृतींना करणेच 'कर्मयोग' आहे. विषयभोगाची कामना हृदयात भरपूर असूनदेखील केवळ बाह्यिक वेष धारण करणे संन्यास नव्हे, ही पाखण्डता (अवडंबर) आहे, त्याच्याद्वारे कल्याण कधीही संभव नाही आहे. भगवत्-सेवारूप कर्माच्या अतिरिक्त आत्मेंद्रिय भोगोन्मुख कर्मांच्या द्वारे कल्याण होऊ शकत नाही. वैदिक यज्ञ इत्यादी कर्मांच्या अनुष्ठानाने लौकिक विषयसुखाची प्राप्ती तर होऊ शकते, परंतु तसे सुख अनित्य आणि दुःखमिश्रित असते. म्हणून अशा अकर्म, विकर्म किंवा सकाम कर्मांना सोडून भगवदर्पित निष्काम कर्मयोगाचे अवलंबन करणेच श्रेयस्कर आहे. कर्मयोगाद्वारे चित्तशुद्धी होते.

**चतुर्थ अध्याय**—याचा आरंभ ज्ञानयोगाच्या उपदेशाने होतो. या

अध्यायाच्या प्रारंभी हे सांगितले गेले आहे की श्रौत–परंपरेच्या द्वारे तत्त्वदर्शी श्रीगुरुदेवांच्या कृपेने अभिसिंचित झाल्यावरच यथार्थ तत्त्वज्ञानाची प्राप्ती होते. लौकिक विद्याबुद्धी किंवा ज्ञानाच्या द्वारे भगवत्–तत्त्वज्ञान प्राप्त करण्याची कोणतीही संभावना (शक्यता) नाही आहे. या अध्यायात हे देखील सांगितले गेले आहे की भगवान प्रत्येक युगात अवतरित होतात. भगवंतांचा जन्म आणि कर्म दिव्य आणि अप्राकृत आहेत. त्यांना प्राकृत समजणे मूर्खतेचे सूचक आणि अपराध–जनक आहे. क्रमशः कर्मयोगापेक्षा ज्ञानयोगाचे वैशिष्ट्य श्रवण केल्यावर तत्त्वदर्शी गुरूंच्या निकटच तत्त्वज्ञानाची प्राप्ती होते. यथार्थ तत्त्वज्ञानाचा आश्रय ग्रहण केल्यावर सुगमतेने भवसागरातून उत्तीर्ण होता येते. या विषयात शंका केल्यावर साधकाचा विनाश सुनिश्चित आहे, कारण या तत्त्वज्ञानाच्या अभावात पतित आणि पथभ्रष्ट होऊन पुन्हा कर्मचक्रातच तो फसून जातो.

**पाचवा अध्याय**—तत्त्वज्ञान प्राप्त केल्यावर साधक कर्मसंन्यास योगाचा अधिकारी बनतो. त्या वेळी तो अनुभव करतो की कर्म आणि कर्मफलाचा आसक्तित्यागच यथार्थ संन्यास आहे. अशुद्धचित्त व्यक्तींसाठी कर्माच्या स्वरूपतः त्यागापेक्षा आसक्तिरहित कर्मयोगाचा आश्रय ग्रहण करणेच उचित आणि प्रशस्त आहे. भगवदर्पित निष्काम कर्मयोगच ब्रह्मपद प्राप्तीची योग्यता प्रदान करतो. ब्रह्मविद् (ब्रह्म जाणणारे) शांतीचे अधिकारी असतात.

**सहावा अध्याय**—ध्यानयोगाच्या विषयात साधक तत्त्वविद् गुरूंच्या उपदेशांना ऐकून चांगल्यारीतीने अनुधावन करतो (समजतो) की चित्त शुद्ध झाल्यावरच भगवत–ध्यान शक्य आहे. कामसंकल्परहित व्यक्तीच यथार्थ योगी किंवा संन्यासी आहे. याच्या व्यतिरिक्त विषयभोगांची कामना असताना योगाची सिद्धी होत नाही. परिमित आहार विहारकारी व्यक्तीचीच योगसिद्धी होते. समस्त प्राण्यांमध्ये अंतर्यामीच्या रूपात भगवद्दर्शन आणि श्रीभगवंतांच्या आश्रयातच जिवांची स्थिती आहे—असा अनुभवच योगाची सिद्धी आहे. या अध्यायात हे देखील विदित होते की भक्त तपस्वी, कर्मी, ज्ञानी आणि योगींपेक्षाही श्रेष्ठ आहेत.

**सातवा अध्याय**—या अध्यायात विज्ञानयोग किंवा भक्तियोगाचे वर्णन आहे. या अध्यायाचे अनुशीलन केल्याने या विषयाची दृढ उपलब्धी होते की भगवान श्रीकृष्णच परतत्त्वाची चरमसीमा आहेत. त्यांच्या व्यतिरिक्त आणखी कुणीही परमतत्त्व नाही आहे. त्यांच्या

श्रीचरणकमळी ऐकान्तिक रूपाने शरणागत झाल्याशिवाय मायाजालातून सुटका प्राप्त करण्याचा आणखी काहीही उपाय नाही आहे. मूढ, नराधम, असुरभावापन्न आणि मायेद्वारे अपहृतज्ञानविशिष्ट —हे चार प्रकारचे दुष्कृतिसंपन्न व्यक्ती भगवद्भजन करीत नाहीत आणि याच्या विपरीत आर्त इत्यादी चार प्रकारच्या सुकृतिसंपन्न व्यक्ती भगवद्भजन करतात. या जगात भगवद्भक्त सुदुर्लभ आहेत. अन्यान्य देवीदेवतांच्या आराधनेने नित्यकल्याण साधित होऊ शकत नाही.

**आठवा अध्याय**—तारक ब्रह्म योगाचे वर्णन या अध्यायात केले गेले आहे. श्रीकृष्णांचे ऐकान्तिक भक्तच ब्रह्म, कर्म आणि अधिभूत इत्यादी तत्त्वांना जाणू शकतात. **ऐकान्तिक भक्तांच्या द्वारेच कृष्णप्राप्ती सुलभ आहे** (गीता ८/१४). **भगवद्भक्ताचा पुनर्जन्म होत नाही** (गीता ८/१६). **अनन्या भक्तीद्वारेच भगवत्प्राप्ती होते** (गीता ८/२२).

**नववा अध्याय**—या अध्यायात राजगुह्य योगाचे वर्णन आहे. शुद्ध भक्तियोगालाच राजविद्या किंवा राजगुह्य म्हटले आहे. जगत्–सृष्टीच्या कार्यात प्रकृती मूळ कारण नाही आहे. भगवंतांची इच्छा किंवा प्रेरणेनेच प्रकृती सृष्टीची शक्ती लाभ करते. भगवान श्रीकृष्णांच्या सच्चिदानन्दमय देहाला साधारण बद्धजीवाच्या शरीरासमान पंचतत्त्वात्मक समजणे किंवा श्रीकृष्णांना मनुष्य मानणे मूढता (मूर्खता) आणि अपराध आहे. जे लोक यथार्थ महात्मा असतात, ते अनन्य भावाने श्रीकृष्णांचे भजन करतात. अशा अनन्य भक्ताचा योगक्षेम श्रीकृष्ण स्वतःच वहन करतात. इतर देवदेवतांचे भजन करणे विधिसंमत नाही आहे. श्रीकृष्णच समस्त यज्ञांचे भोक्ता आणि प्रभू आहेत. शुद्धभक्तांद्वारे प्रीतिपूर्वक दिलेले पदार्थ श्रीभगवान ग्रहण करतात. अध्यायाचा अंतिम श्लोक 'मन्मना भव' द्वारा एकमात्र भक्तीलाच भगवत्प्राप्तीचे साधन निर्धारित केले गेले आहे.

**दहावा अध्याय**—या अध्यायात विभूतियोगाचे वर्णन आहे. याचे गंभीर रूपाने अनुशीलन केल्यावर हे विदित होते की श्रीकृष्णच साऱ्या विभूतींचे आणि शक्तींचे आधार आहेत. समग्र विश्वातील साऱ्या विभूती त्यांची एकपाद विभूतिमात्र आहेत. विभूतींचे ज्ञान प्राप्त झाल्यावर सहजच समजता येते की कोणत्या ना कोणत्या प्रकारे साऱ्या वस्तूंचा संबंध भगवंतांशीच आहे. भगवंत आपल्या भक्तांना बुद्धियोग प्रदान करतात, ज्याने त्यांना तत्त्वज्ञान लाभते, अज्ञानाचा नाश होऊन जातो आणि ते प्रीतिपूर्वक भजन करतात.

**अकरावा अध्याय**—या अध्यायात वर्णित विश्वरूप-दर्शनयोगाच्या अनुशीलनाने हे विदित होते की भगवंतांचे विश्वरूप मायिक आहे. अप्राकृत नरवपूच त्यांचे स्वरूप आहे. प्रेमनेत्राच्या द्वारेच भक्तजन त्यांच्या रसिकशेखर रूपाचे दर्शन करतात. अनन्य भक्तियोगाच्या द्वारेच भगवत्प्राप्ती होते.

**बारावा अध्याय**—भक्तियोग शीर्षक असलेल्या या अध्यायात सांगितले आहे की स्वतः भगवान श्रीकृष्णच जिवांचे एकमात्र परम उपास्य तत्त्व आहेत. ऐकान्तिक भक्तियुक्त भक्तच त्यांचे प्रियतम आहेत. शुद्धा भक्तीच्या द्वारे सहजच भगवद्-प्राप्ती होते. निर्विशेष ब्रह्मवादींना केवळ क्लेशच प्राप्त होतो.

**तेरावा अध्याय**—या अध्यायात प्रकृती आणि पुरुषाचे मार्मिक विवेचन केले गेले आहे. या विवेचनाने भगवान आपल्या शरणागत लोकांना तत्त्वज्ञान प्रदान करून संसार-समुद्रातून उद्धार करतात. शुद्ध भक्ती उदित झाल्यावर आनुषंगिक रूपात ज्ञान-वैराग्य सहजच उदित होते. तरीदेखील भक्तितत्त्वाच्या दृढतेसाठी ज्ञान-विज्ञानाचे अनुशीलन करणे आवश्यक आहे. तत्त्वज्ञान प्राप्त झाल्यावर भक्त प्रेमाभक्ती प्राप्तीच्या योग्य बनतो.

**चौदावा अध्याय**—या अध्यायाच्या विश्लेषणाने हे ज्ञान होते की सत्त्व-रजः-तमः—या तिन्ही गुणांनीच जगाचा विस्तार होतो. भक्तियोग अनुष्ठानकारी साधक सहजच त्रिगुणांना पार करून भगवत्प्राप्तीच्या योग्य होऊन जातात आणि शेवटी त्यांना भगवत्प्राप्ती होते.

**पंधरावा अध्याय**—या अध्यायात पुरूषोत्तम योगाची व्याख्या केली गेली आहे. हे जग वरील आणि खालील लोकांमध्ये विस्तृत (पसरलेले) आहे. भगवत्-विमुख जीव कर्माद्वारे आबद्ध होऊन जगातील उच्च-नीच विभिन्न योन्यांमध्ये भ्रमण करतो. श्रीभगवंतांचे विभिन्नांश जीव सौभाग्यवश सद्गुरूंची कृपा प्राप्त करून श्रीकृष्णांनाच पुरूषोत्तम जाणून सर्व प्रकारे त्यांचे भजन करतात. तन्मय किंवा आविष्ट होऊन भजन केल्यावर ते सर्वविद् होऊन हे जग अनायासच पार करून जातात.

**सोळावा अध्याय**—या अध्यायात दैवी आणि आसुरी संपत्तींचे वेगवेगळे वर्णन केले गेले आहे. भगवंतांच्या मायेद्वारे विमोहित जीव दैवी किंवा आसुरी संपत्तीच्या वशीभूत होतो. दैवी प्रकृतीचा आश्रय ग्रहण केल्यावर भगवद्भजनात प्रवृत्ती होते. याच्या ठीक विपरीत आसुरी प्रकृतीचा आश्रय घेतल्यावर तो भगवंतांशी विद्वेष करायला लागतो आणि परिणामस्वरूप नरकगामी होतो. आसुरी प्रकृतीचे

लोकच मायावादाचा प्रचार करतात. म्हणून शुद्ध भक्तांच्या संगात श्रद्धापूर्वक भगवद्भजनाद्वारे आसुरी स्वभाव दूर करणे आवश्यक आहे.

**सतरावा अध्याय**—सतराव्या अध्यायात तीन प्रकारची श्रद्धा सांगितली गेली आहे. मनुष्य संग आणि पूर्व संस्काराने प्राप्त स्वभावाच्या अनुरूपच सात्त्विक, राजसिक किंवा तामसिक तत्वाच्या प्रती श्रद्धाळू होतो. शुद्ध हरिभक्तांच्या संगाने जिवांच्या हृदयात निर्गुणा श्रद्धा उदित होते. या अवस्थेत ते निर्गुण श्रीहरीचे भजन करतात. असे भक्तच यथार्थ साधू आहेत.

**अठरावा अध्याय**—या अध्यायात संपूर्ण गीतेचे सार सांगितले आहे. याच्यात श्रीकृष्णांनाच सर्वोत्तम भगवत्–तत्त्व सांगून पहिले त्यांच्या प्रती शरणागती पुन्हा नवधा भक्ती आणि शेवटी भावभक्तीचा आश्रय ग्रहण करून त्यांच्या परमधामात रसमयी सेवेच्या प्राप्तिरूप सर्वगुह्यतम उपदेश निर्धारित केला गेला आहे.



# चौथा परिच्छेद

शास्त्रांमध्ये अनेक धामांचे वर्णन आहे, परंतु समग्र ब्रह्मांडात वृंदावनासारखे दुसरे धाम नाही आहे. वृंदावनाचा महिमा केवळ वृंदावनाची कृपा प्राप्त व्यक्तीच समजू शकते. श्रीकृष्ण आपल्या नित्य परिकरांसोबत येथे दिव्य लीला–विलास इत्यादी करतात. भक्ताच्या जीवनाची परम–सिद्धी हीच आहे की श्रीकृष्णांच्या लीलांचे नेहेमी स्मरण राहावे आणि श्रीराधाकृष्ण युगुलाच्या नित्य–परिकरांच्या प्रेममय सेवा–परिपाठाच्या (वहिवाटीच्या) भावनेत मन आणि हृदय पूर्णतया आविष्ट (मग्न) होऊन जावे.

या भाव, लीला–विलास इत्यादींचे श्रीमद्भागवतात विशद रूपाने वर्णन केले गेले आहेत, जे सर्वोपरि–चिन्मय (सर्वश्रेष्ठ दिव्य) शास्त्र आहे. या सर्व प्रसंगांना समजण्यासाठी श्रीमद्भगवद्गीतेची उपदेशावली पाया प्रस्तुत करते. याच आधारावर श्रीमद्‌भागवतरूपी द्वादश माळयांचा (बारा मजल्यांचा) प्रासाद (महाल) निर्मित आहे. नऊ माळे किंवा स्कंध खाली आहेत आणि दोन माळे वर आहेत, मधे आहे दहावा माळा अथवा दशम स्कंध. या दहाव्या स्कंधात नव्वद कुंज आहेत, जे अध्याय समूह आहेत. या कुंजांच्या केंद्रस्थानी रासपंचाध्यायीरूपी पाच विशेष प्रकोष्ठ आहेत, जेथे श्रीराधाकृष्णयुगुल विलासरत (विलासात मग्न) आहेत. असे वाटते की त्या (श्रीमती राधिका) श्रीकृष्णांची सेवा करीत आहेत. परंतु वास्तविक रूपात श्रीकृष्ण त्यांची सेवा करीत आहेत. जोपर्यंत श्रीमद्भवद्गीतेच्या उपदेशांचा पाया आपल्या हृदयात स्थापित होत नाही तोपर्यंत आपण या दिव्य रसमय लीलांसंबंधी एक जड (निर्जीव, प्राकृत, अचेतन) धारणा करून घेतो, जी आमच्या सर्वनाशाचे कारण बनते.

गीतेत (१८/६५) आपण पाहतो—

**मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु।**
**मामैवैष्यसि सत्यं ते प्रतिजाने प्रियोऽसि मे॥**

"आपले मन आणि हृदय माझ्यात आविष्ट (मग्न) करा, माझे भक्त बना, माझी पूजा करा, मला प्रणाम करा, अशा प्रकारे निश्चितरूपाने तुम्ही मला प्राप्त करू शकाल. मी तुमच्या निकट प्रतिज्ञा करतो, कारण तुम्ही (अर्जुन) माझे सर्वाधिक प्रिय आहात."

हाच भगवद्गीतेचा सर्वश्रेष्ठ श्लोक आहे. हा श्लोक आपल्या परवर्ती (नंतरच्या) श्लोकापेक्षाही (१८/६६) उत्तम आहे ज्यात श्रीकृष्ण म्हणतात—

**सर्व–धर्मान् परित्यज्य मामेकं शरणं व्रज।**

**अहं त्वां सर्व–पापेभ्यो मोक्षयिष्यामि मा शुचः॥**

"समस्त प्रकारचे जागतिक धर्म, शारीरिक किंवा मानसिक, वर्णाश्रम–धर्म, अन्य देवीदेवतांची पूजा देखील त्यागून केवळ मला शरण या, घाबरू नका कारण मी तुमची सर्व पापे नष्ट करून टाकीन."

परंतु 'मन्मना भव' श्लोक याहीपेक्षा अधिक महत्त्वपूर्ण आहे. 'सर्वधर्मान् परित्यज्य' श्लोक शरणागतीचा उपदेश देतो, तर 'मन्मना भव' श्लोक त्याच शरणागतीचे फळ 'प्रेमाभक्ती' प्रदान करतो, ज्यामुळे या श्लोकाची महिमा अधिक आहे.

जेंव्हा आपण गीतेचे अध्ययन करतो, विशेषतः जेंव्हा आपण गीतेवरील आचार्यांच्या विविध व्याख्या पाहतो, तेंव्हा त्या व्याख्यांमध्ये गीतेचे पाच प्रकारचे उपदेश प्राप्त होतात.

**१. सर्वांकरिता साधारण उपदेश**

**२. गुह्य (गूढ किंवा रहस्यमय)**

**३. गुह्यतर (अधिक गूढ किंवा अधिक रहस्यमय)**

**४. गुह्यतम (अत्यंत रहस्यमय)**

**५. सर्व–गुह्यतम (सर्व गूढ उपदेशांमध्ये देखील अत्यधिक गूढ किंवा रहस्यमय)**

गीतेमध्ये हे उपदेश विस्तृत रूपात न सांगता, किंबहुना सूत्र–रूपात सांगण्यात आहे आहेत.

## *साधारण उपदेश*

साधारण व्यक्तींसाठी भगवान श्रीकृष्ण म्हणतात—

**युक्ताहारविहारस्य युक्तचेष्टस्य कर्मसु।**
**युक्तस्वप्नावबोधस्य योगो भवति दुःखहा॥**

*(गीता ६/१७)*

"यथायोग्य आहार–विहार करणाऱ्या, कर्मांत यथायोग्य प्रयत्न करणाऱ्या आणि यथायोग्य झोपणाऱ्या आणि जागणाऱ्यांचा योग सांसारिक क्लेशांना हरण करणारा असतो."

अधिक आहार करू नका आणि अधिक झोपू नका. जगातील (भौतिक, जागतिक) कार्य आणि इंद्रिय–तृप्तीवर नियंत्रण ठेवावे, अन्यथा तुम्ही त्या दुर्लभ योगाला प्राप्त करू शकणार नाही, ज्याच्यात एक आत्मा आपल्या सृष्टीकर्त्यासोबत युक्त होतो. आहार विहारात संयम न ठेवल्यास नाना प्रकारच्या व्याधी (रोग, आजार) उत्पन्न होतात, त्यामुळे साधनेत विघ्न येते. त्याच प्रकारे विविध

चिंतांनी उद्विग्न चंचल मनाने देखील साधनेची सिद्धी होऊ शकत नाही. साधारण रूपात श्रीकृष्णांनी हे ज्ञान प्रदान केले आहे की आम्ही हे शरीर नाही आहोत. शारीरिक कामनांपासून वेगळे राहा, त्यांच्या तृप्तीसाठी प्रयत्न प्रयत्न करू नका.

**जातस्य हि ध्रुवो मृत्यु ध्रुवं जन्म मृतस्य च।**

*(गीता २/२७)*

ज्याने जन्म ग्रहण केला आहे, त्याचा मृत्यू अटळ आहे आणि परवर्ती (म्हणजे नंतरच्या) अवस्थेत त्याचा पुनर्जन्म निश्चित आहे. अर्जुन सर्वांसाठी शोक करित आहेत—पुत्रासाठी, पत्नीसाठी, आप्तस्वकीयांसाठी, बंधुबांधवांसाठी, आम्ही सुद्धा या सर्वांसाठी शोक करीत असतो.

**श्रीभगवानुवाच—**
**अशोच्यानन्वशोचस्त्वं प्रज्ञावादांश्च भाषसे।**
**गतासूनगतासूंश्च नानुशोचन्ति पण्डिताः॥**

*(गीता २/११)*

श्रीभगवान अर्जुनांना म्हणाले—"तुम्ही शोक न करण्यायोग्य वस्तूंसाठी (व्यक्तींसाठी) शोक करता आहात, पुन्हा पांडित्यपूर्ण शब्दपण बोलत आहात. परंतु, पंडितगण तर प्राणहीन (मृत) किंवा प्राणवानां(जिवितां)साठी शोक करीत नाहीत."

विज्ञ (बुद्धिमान) व्यक्ती जीवित अथवा मृत व्यक्तींसाठी शोक करित नाहीत. सगळयांनाच देहाचा त्याग करावा लागणार आहे. जे आज (परलोकी) गेले नाहीत, त्यांना उद्या किंवा परवा जावेच लागते, त्यांच्यासाठी दुःख करू नका. शरीरातील अजर (म्हातारपण नसणाऱ्या, चिरतरुण), अमर (मृत्यू नसणाऱ्या, शाश्वत, नित्य, अविनाशी) आत्म्यास नित्य जाणून स्थूल शरीराच्या विनाशाने विचलित होऊ नका.

**नैनं छिन्दन्ति शस्त्राणि नैनं दहति पावकः।**
**न चैनं क्लेदयन्त्यापो न शोषयति मारुतः॥**

*(गीता २/२३)*

आत्म्याला कुठल्याही शस्त्राद्वारे कापता येत नाही किंवा त्याचे तुकडे–तुकडे करता येत नाहीत), अग्नीद्वारे जाळता येत नाही, पाण्याद्वारे आर्द्र (ओले) किंवा पवनाद्वारे (वाऱ्याने) शुष्क (कोरडे) करता येत नाही. आत्मा नित्य आहे, परंतु शरीराचा मृत्यू अवश्य आहे. म्हणून शरीराच्या विषयी अधिक चिंता करू नका.

हो, एक व्यक्ती या संदर्भात असा विचार करू शकते

—भगवंतांनी हे शरीररूपी मंदिर त्यांचे भजन करण्यासाठी प्रदान केले आहे, या तथ्याचा अनुभव केल्यानंतर ती व्यक्ती शरीर रक्षणासाठी प्रयत्न करू शकते. आम्ही हे शरीर स्वच्छ ठेवावे आणि आवश्यकतेनुसार (वैद्यकीय) चिकित्सा वगैरे घ्यावी, अन्यथा आम्ही भजन करू शकणार नाही. या उद्देशाने शारिरीक आरोग्यासाठी प्रयत्न करणे ठीक आहे, परंतु हे सर्व वैराग्ययुक्त भावनेने व्हायला हवे. अंतिमतः (शेवटी) भगवंत या शरीरास वापस मागतील आणि त्याच वेळी या शरीराला त्यांना वापस देणे आमच्यासाठी अनिवार्य (अपरिहार्य) आहे. भगवंत आम्हाला जाब विचारतील—"मी तुम्हाला हे दुर्लभ मूल्यवान मानव शरीर दिले होते, त्याच्याद्वारे तुम्ही काय कार्य साधले?"

म्हणून त्यांनी अशा प्रकारचे श्लोक भगवंतांनी म्हटले आहेत—

**या निशा सर्वभूतानां तस्यां जागर्त्ति संयमी।**
**यस्यां जाग्रति भूतानि सा निशा पश्यतो मुनेः॥**

*(गीता २/६९)*

जेंव्हा साधारण लोक झोपलेले असतात तेंव्हा साधू आत्मानुभूतीमध्ये जागृत रहातात. आणि जेंव्हा साधू निद्रित (निजलेले) असतात, तेंव्हा साधारण लोक आपल्या इंद्रिय-तृप्तीमध्ये जागृत(जागरूक, जागे) रहातात. म्हणून तुम्ही सरलतापूर्वक (निष्कपट भावे) भगवद्-भजनात निमग्न राहावे आणि सुख-दुःखाला समान मानून आपले कर्तव्य कर्म करीत राहावे.

**कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन।**

*(गीता २/४७)*

"आपले कर्म करीत जा आणि आपल्या श्रमाच्या फळाची इच्छा धरू नका." येथपर्यंतचा उपदेश हा 'साधारण उपदेश' (जनसामान्यांसाठी असलेला उपदेश) आहे.

## *गुह्य (गूढ) उपदेश*

यानंतरचा गुह्य (गूढ) उपदेश 'ब्रह्मज्ञान' म्हटला जातो. आत्मा चिद्-वस्तू आहे आणि परब्रह्माचा अंश आहे.

**स्थितप्रज्ञस्य का भाषा समाधिस्थस्य केशव।**
**स्थितधीः किं प्रभाषेत किमासीत व्रजेत किम्॥**

*(गीता २/५४)*

अर्जुनांनी प्रश्न विचारला—"हे केशव! समाधीमध्ये स्थित

असणाऱ्या 'स्थिर' बुद्धी असलेल्या व्यक्तीची काय लक्षणे आहेत? ती कशाप्रकारे बोलते, कशाप्रकारे बसते आणि कशाप्रकारे चालते?"

अष्टादश (अठराव्या) अध्यायात हा सिद्धांत आहे की—

**ब्रह्मभूतः प्रसन्नात्मा न शोचति न काङ्क्षति।**
**समः सर्वेषु भूतेषु मद्भक्तिं लभते पराम्॥**

*(गीता १८/५४)*

ब्रह्मात अवस्थित प्रसन्नचित्त व्यक्ती शोकही करीत नाही आणि आकांक्षाही करीत नाही. ती सर्व जिवांमध्ये समदर्शी होऊन प्रेमलक्षणयुक्त माझी भक्ती प्राप्त करते."

ब्रह्मभूत शब्दाचे तात्पर्य आहे—'जिवाचे आपल्या स्वरूपगत नित्य स्थितीत प्रतिष्ठित होणे'. 'ब्रह्मभूत' अवस्था प्राप्त झालेल्या जिवांची लक्षणे येथे सांगण्यात येत आहेत—

**(क) प्रसन्नात्मा—**'प्राकृत गुणमय सूक्ष्म शरीर दूर झाल्यामुळे ते सदा-सर्वदा प्रसन्न राहातात'—हे प्रथम लक्षण आहे.

**(ख) न शोचति—**'नष्ट झालेल्या विषयांसाठी ते कधीच शोक करीत नाहीत.'

**(ग) न कांक्षति—**भगवत्-प्रितीच्या कामनेव्यतिरिक्त कुठल्याही सांसारिक विषयांची आकांक्षा ते करीत नाहीत. म्हणजे दैहिक (देहाचा) अभिमान न उरल्यामूळेच ते विषय-भोगाच्या लालसेने विहीन असतात.

**(घ) समः सर्वेषुभूतेषु—**भद्र-अभद्र समस्त प्राण्यांप्रती बालकांप्रमाणे समदर्शी असणे.

**(ङ) मद्भक्ति पराम्—**ते माझ्या पराभक्तीची अभिलाषा बाळगणारे असतात.

ही त्यांची लक्षणे आहेत. अशा लक्षणांनी युक्त ब्रह्मभूत महात्मा, साधूंच्या संगतीत भगवंताची परा-प्रेमाभक्ती (सर्वोत्तम प्रेममय भक्ती) प्राप्त करतात.

**द्वाविमौ पुरुषौ लोके क्षरश्चाक्षर एव च।**
**क्षरः सर्वाणि भूतानि कूटस्थोऽक्षर उच्यते॥**

*(गीता १५/१६)*

"क्षर आणि अक्षर—हे दोन पुरुष तत्त्वे चौदा लोकात प्रसिद्ध आहेत. यांच्यातील चराचर भूतसमूहाला क्षर आणि कूटस्थ पुरुषाला अक्षर म्हटले जाते."

क्षर आणि अक्षर—ही दोन पुरुष तत्त्वे आहेत. याच्यांतील आपल्या स्वरूपातून विच्युत (पतित) होणारे 'क्षर तत्त्व'च—'जीव'

आहे आणि जे आपल्या स्वरूपातून कधीच विच्युत होऊ शकत नाही, ते 'स्वांश तत्त्व'च 'अक्षर पुरुष' आहे. 'अक्षर पुरुषा'चे दुसरे नाव 'कूटस्थ पुरुष' देखील आहे. जो एकरूपाने सर्वकालव्यापी आहे, तोच कूटस्थ आहे.

**त्या कूटस्थ अक्षर पुरुषाचे तीन प्रकाश आहेत—(१) ब्रह्म, (२) परमात्मा आणि (३) भगवान.** जगाची सृष्टी झाल्यानंतर जगात सर्वव्यापी सत्ता-स्वरूपात तसेच जगाच्या समस्त धर्मांच्या विपरीत अवस्थेत जे अक्षर पुरुष लक्षित होतात, तेच ज्ञानीजनांचे उपास्य ब्रह्म आहेत. म्हणूनच ब्रह्म जगाच्या संबंधी एक तत्त्व विशेष आहे, स्वतंत्र तत्त्व नाही. साधारण रूपात हेच 'ब्रह्मज्ञान' होय.

## *गुह्यतर (अधिक गूढ) उपदेश*

यानंतर येते गुह्यतर (अधिक गूढ), जे 'परमात्म-ज्ञान' आहे.

**उत्तमः पुरुषस्त्वन्यः परमात्मेत्युदाहृतः।**
**यो लोकत्रयमाविश्य बिभर्त्यव्यय ईश्वरः॥**

*(गीता १५/१७)*

"परंतु पूर्वोक्त क्षर आणि अक्षर तत्त्वाने भिन्न एक अन्य उत्तम पुरुष 'परमात्मा' म्हणविला जातो, जो ईश्वर आणि निर्विकार आहे आणि तिन्ही लोकांमध्ये प्रविष्ट होऊन त्यांचे पालन करतो."

ज्ञानीजनांचे उपास्य असणाऱ्या 'ब्रह्म' तत्त्वाविषयी सांगितल्यानंतर 'उत्तमः' इत्यादी द्वारे योगींचे उपास्य असणाऱ्या परमात्म्याविषयी श्रीकृष्ण सांगत आहेत. 'तु' शब्द पहिल्यापेक्षा विशेष असण्याचे द्योतक आहे. गीता (६/४६) मध्ये म्हटले आहे—'ज्ञानिभ्यश्चाधिको योगी' म्हणजे योगी ज्ञानीजनांपेक्षाही श्रेष्ठ आहेत. या वाक्याने हेच जाणता येते की उपासकाचे वैशिष्ट्य असल्यामुळे उपास्याचे देखील वैशिष्ट्य असते. परमात्म-तत्त्व अशाप्रकारे विशद केले आहे—जो ईश्वर म्हणजे नियामक आहे, 'अव्ययः' म्हणजे निर्विकार भावात समग्र त्रिलोकात (तिन्ही लोकांत) प्रविष्ट होऊन त्या तिन्ही लोकांना धारण करतो आणि त्यांचे पालन करतो, तोच परमात्मा होय.

'तृतीय आणि सर्वोत्कृष्ट अक्षर पुरुषाचे नाव' भगवान आहे. श्रीकृष्ण तेच 'भगवत्-तत्त्व' आहेत. ते क्षर-पुरुष 'जिवा'च्या पलीकडले आणि अक्षर-पुरुष—'ब्रह्म' आणि 'परमात्मा'—यांच्यापेक्षाही उत्तम आहेत. म्हणूनच जगात आणि वेदांमध्ये त्यांना पुरूषोत्तम म्हटले गेले आहे.

**ब्रह्म, परमात्मा आणि भगवान यांच्या उपासकांकरिता त्यांच्या प्राप्तीचे साधन क्रमशः ज्ञान, योग आणि भक्ती आहे.** ज्ञान आणि योगाचे फळ मोक्ष आहे परंतु भक्तीच्या सहाकार्याशिवाय ज्ञान आणि योग यांद्वारे मोक्ष प्राप्त होत नाही. भगवंतांच्या उपासकांना आपल्या साध्याच्या सिद्धीसाठी ब्रह्म अथवा परमात्म्याची उपासना करावी लागत नाही.

**क्लेशोऽधिकतरस्तेषामव्यक्तासक्तचेतसाम्।**

*(गीता १२/५)*

निर्विशेष ब्रह्मस्वरूपात ज्यांचे चित्त आसक्त आहे—अशा व्यक्तींना अधिकतर क्लेश होतात, कारण इंद्रियांचा विरोध करूनच अव्यक्त ब्रह्माविषयी जाणले जाऊ शकते. ज्याची गती व्यक्त होत नाही त्याला प्राप्त करणे अत्यंत कष्टप्रद असते. म्हणूनच निराकार ब्रह्माकडे जाण्याचा प्रयत्न करू नका. सावधान! कुण्या आकारहीनाचे ध्यान करण्यात अत्याधिक कष्ट आहेत. त्याबदल्यात परमात्म्याचे आपल्या हृदयात ध्यान करावे. परमात्मा प्रत्येक जिवाच्या हृदयात अंगुष्ठ (अंगठ्याच्या) आकारात निवास करतात. त्यांचे ध्यान करून जर त्यांच्या निकट पोहोचू शकत नाही तर परत प्रयत्न (कृती) करा. हेच योगिजनांचे परमात्म–ज्ञान आहे. परंतु वास्तविक 'योगी' तेच असतात जे चित्त आणि देहाला संयत (संयमित) करून, विषयांचा अस्वीकार करून योगाद्वारे परमात्म्याने युक्त होतात.

**श्रीभगवानुवाच–**<br>**अनाश्रितः कर्मफलं कार्यं कर्म करोति यः।**<br>**स संन्यासी च योगी च न निरग्निर्न चाक्रियः॥**

*(गीता ६/१)*

श्रीभगवान म्हणाले—"जे कर्मफळाची अपेक्षा न करता अवश्य करणीय (करण्यायोग्य) कर्मांना करतात, ते संन्यासी आणि योगी आहेत. अग्निहोत्र इत्यादी कर्मांचा त्याग करणारा संन्यासी नाही आहे आणि फक्त दैहिक (शारीरिक) कर्मांचा परित्याग करणारा योगी नाही आहे."

हेच ज्ञान गुह्यतर आहे.

## गुह्यतम उपदेश

गुह्यतम उपदेश नवव्या अध्यायात दिला गेला आहे. हे शुद्ध भक्तीच्या लक्षणांनी युक्त ज्ञान आहे—जे गुह्यतम आहे. या गुह्यतम

ज्ञानाद्वारेच या संसाररूप (म्हणजे भौतिक जगातील) अशुभातून मुक्ती प्राप्त होते.

**श्रीभगवानुवाच—**

**इदन्तु ते गुह्यतमं प्रवक्ष्याम्यनसूयवे।**
**ज्ञानं विज्ञानसहितं यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेऽशुभात्॥**

*(गीता ९/१)*

श्री भगवान म्हणाले—"हे अर्जुना! मी दोषमुक्त तुम्हाला विज्ञानयुक्त, केवळ शुद्धभक्ति-लक्षणाने युक्त हे ज्ञान सांगेन, जे जाणून तुम्ही या दुःखमय संसारातून मुक्त होऊन जाल."

या अध्यायात 'केवला' भक्तीचे सर्वश्रेष्ठत्व वर्णिले गेले आहे, ज्यात अंतःकरणाच्या शुद्धीची अपेक्षा नसते. अत्यंत दुराचारी अनर्थग्रस्त व्यक्तींच्या हृदयातही भक्ती कृपापूर्वक प्रवेश करून त्यांना परमपवित्र आणि विश्व-वंदनीय सर्वश्रेष्ठ महाभागवत बनविते.

गुह्यतम 'शुद्धा' भक्तीच्या संबंधीचे हे ज्ञान परम विज्ञानमय आहे. ईश्वर विषयक ज्ञानाला अनूभूतिसहित विशेष रूपात जाणणेच विज्ञान होय. येथील वर्णन शुद्धभक्तिविषयक आहे, परंतु येथे भगवंतांच्या रसपूर्ण परिचर्येविषयी माहिती देण्यात आली नाही. जरी ही शुद्ध-भक्ती आहे, तरीसुद्धा ती रसमय नाही.

## *सर्वगुह्यतम उपदेश*

अठराव्या अध्यायाच्या शेवटी सर्वगुह्यतम उपदेश प्रदान केलेला आहे.

**सर्वगुह्यतमं भूयः श्रृणु मे परमं वचः।**
**इष्टोऽसि मे दृढमिति ततो वक्ष्यामि ते हितम्॥**

*(गीता १८/६४)*

अतिशय गंभीर अर्थाने परिपूर्ण असे गीताशास्त्र श्रवण करून अर्जुन निःस्तब्ध (पूर्णतः स्तब्ध) झाले, हे पाहून नवनीताच्यासमान (ताज्या लोण्यासारखे मऊमुलायम) चित्त असणाऱ्या भगवान श्रीकृष्णांचे हृदय द्रवीभूत झाले आणि ते म्हणाले—"हे प्रिय मित्र अर्जुन! आता जे मी सांगणार आहे ती वाक्ये 'परमम्' आहेत, म्हणजे गीताशास्त्र जे सर्व शास्त्रांचे सार आहे, त्याचेदेखील सार आहे. 'गुह्यतमम्'—या वाक्यांपेक्षा अधिक गुह्य आणखी काहीच नाही, कुठेच नाही आणि कुठे कशाप्रकारे असूही शकत नाही, हे अखंड आहे. या वाक्यांना पुन्हा सांगण्याचे कारण हे आहे की तू माझा अतिप्रिय सखा आहेस, म्हणून तुझ्या मंगलासाठी मी हे

सांगणार आहे. का नाही! कारण कुठलीही व्यक्ती आपल्या प्रिय मित्राव्यतिरिक्त अन्य कोणालाही अतिरहस्यपूर्ण गोष्ट सांगत नाही."

"मी तुम्हाला 'गुह्य ब्रह्म–ज्ञान' आणि 'गुह्यतर ईश्वर–ज्ञान' या विषयी सांगितले. आता 'गुह्यतम भगवत्–ज्ञानाचा' उपदेश देत आहे, श्रवण करावे. या गीताशास्त्रात मी जितके उपदेश केले आहेत, त्या सर्वांपेक्षा हा उपदेश श्रेष्ठ आहे. तुम्ही मला अत्यंत प्रिय आहात, तेंव्हा तुमच्या हितासाठी हे मी सांगत आहे."

**मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु।**
**मामेवैष्यसि सत्यं ते प्रतिजाने प्रियोऽसि मे॥**

*(गीता १८/६५)*

"तुम्ही मला तुमचे चित्त समर्पण करा, माझ्या नाम–रूप–लीला इत्यादींच्या श्रवण–कीर्तन परायण होऊन माझे भक्त बना, माझी पूजा करणारे बना आणि मला नमस्कार करा. अशा प्रकारे तुम्ही मलाच प्राप्त व्हाल. मी तुमच्याजवळ ही सत्य प्रतिज्ञा करतो आहे, कारण तुम्ही माझा प्रिय आहात".

हाच भगवद्गीतेचा सर्वश्रेष्ठ श्लोक आहे. हा रसमय आहे आणि भक्तीची चरम (अंतिम) सीमा आहे. येथे भगवान सर्वगुह्यतम उपदेश करित आहेत. तो उपदेश काय आहे? या आधी, श्रीकृष्णांनी नारायणांच्या पूजेपर्यंतचे वर्णन केले होते, जी भगवंतांची ऐश्वर्य–बुद्धीने केलेली पूजा आहे. परंतु या श्लोकात चार विशेष क्रियांचे वर्णन आहे. पहिले आहे—'मन्मना भव', सर्वदा माझे चिंतन करा, दुसरे आहे—'मां नमस्कुरु', मला प्रणाम करा. जर तुम्ही पहिले नाही करू शकत तर दुसरे करा. जर तेही नाही करू शकत तर तिसरे करा. जर तेही जमत नसेल तर केवळ प्रणाम करा, त्यानेच सर्व काही होईल.



भगवान श्रीकृष्ण म्हणतात, "माझे एकांत भक्त सर्वदा समस्त कर्म करूनही माझ्या कृपेने नित्य, अव्यय वैकुंठधाम प्राप्त करतात. माझे ऐकान्तिक भक्त नित्य, नैमित्तिक आणि काम्य कर्म करताना सुद्धा कर्मफळात आबद्ध होत नाहीत. ते माझ्या कृपेने शीघ्रच नित्य वैकुंठ–गोलोक आदी धाम प्राप्त करतात." येथे ऐकान्तिक भक्तांप्रती भगवंतांचा अत्यंत अनुग्रह दिसून येतो.

*(गीता श्लोकार्थ व तात्पर्य १८/५६)*

# पाचवा परिच्छेद

या अध्यायात **'मन्मना भव'**—'आपले मन आणि हृदय माझ्यात आविष्ट करा'—याची चर्चा करू या. असे करणे सहज नाही. जर कुणी व्यक्ती कुण्या एका वस्तूत मन आविष्ट करू पहात असेल तर तिचे नेत्र, कान इत्यादी समस्त इंद्रिये केवळ त्याच वस्तूवर केंद्रित असायला हवीत. जर मन कुठल्या वस्तूवर केंद्रित होऊ शकत नसले, तर ते अनियंत्रित मन आहे. आपले मन कधी विषयांमध्ये गुरफटते तर कधी श्रीकृष्णांविषयी चिंतन करते. हीच आमची बद्ध अवस्था आहे. परंतु जर कुणाचे मन श्रीभगवंतांच्या चरणकमलांत पूर्ण निविष्ट रहाते, तर तीच सर्वोत्तम प्रकारची पूजा आहे. कुण्या साधकासाठी असे केंव्हा शक्य असेल? श्रद्धारूपी प्रारंभिक अवस्थेत हे संभव नसते. क्रमशः रुचीची अवस्था आल्यानंतरही हे संभव नसते. रुचीच्या अवस्थेनंतर आपण यथार्थाने आपले हृदय भगवंताला देऊ लागतो. आसक्तीच्या अवस्थेत आपण आपल्या हृदयाचा अर्धा अंशच भगवंतांना समर्पित करू शकतो, भाव अवस्थेत तीन-चतुर्थांश अंश समर्पित करू शकतो, परंतु प्रेम-अवस्था प्राप्त केल्यावरच आपण आपले हृदय पूर्ण रूपाने श्रीकृष्णांना समर्पित करू शकतो.

जेंव्हा श्रीकृष्ण, उद्धवांना वृंदावनात गोपींकडे पाठवित होते, त्यावेळेस त्यांनी अत्यंत चातुर्याने आणि विशिष्ट वाक्यशैलीद्वारे म्हटले, "हे उद्धवा! माझे माता-पिता माझ्या विरहात फार दुःखी आहेत. तुम्ही वृंदावनात जाऊन माझ्या संदेशाद्वारे त्यांचे सांत्वन करून यावे (म्हणजेच त्यांना दिलासा किंवा धीर देऊन यावे)."

हे ऐकून उद्धव श्रीकृष्णांजवळ काही क्षण थांबले आणि मग म्हणाले—"या व्यतिरिक्त आणखी काही कार्य आहे काय?"

श्रीकृष्णांनी विचार केला, "यांना काय सांगू आणि काय न सांगू?" ते थोडे चिंतित झाले. थोड्या वेळाने विचार करून त्यांनी निर्णय घेतला, "जर मी यांना आत्ता नाही सांगितले तर मग कधी सांगणार?"

श्रीकृष्ण म्हणाले, "हो, एक कार्य आणखी आहे. त्या वृंदावनात गोपी आहेत ज्या माझ्या प्रियतमा (प्रेयसी, प्रेमिका, सजणी) आहेत. त्यांनी आपले संपूर्ण हृदय मला समर्पित केले आहे, आणि माझ्याशिवाय त्या कुणालाच जाणत नाहीत. माझ्यासाठी त्यांनी आपल्या समस्त दैहिक (शारिरीक, कायिक) क्रिया आणि दैहिक आवश्यकता त्यागल्या आहेत. जी व्यक्ती आपल्या समस्त दैहिक

आवश्यकता विसरून गेली आहे, तिची दशा कशी असेल बरे? त्या खाणेपिणे, स्नान इत्यादी कृत्ये, वस्त्र आणि अलंकारांनी स्वतःला सजविणे आणि आपल्या केसांना सावरणे, विसरुन गेल्या आहेत. त्यांचे देह खूप क्षीण झालेत आणि तू बघ की कशाप्रकारे त्यांनी माझ्यासाठी समस्त बंधू–बांधव, गृह, धन (पैसाअडका) इत्यादींचा परित्याग केला आहे. त्या केवळ माझ्यावरच प्रेम करतात आणि रात्रंदिवस माझ्या तीव्र स्मरणात निमग्न असतात. उद्धवा! या जगात आपले हृदय अशा प्रकारे दुसऱ्याला देण्याचे उदाहरण तू पाहिलेच नसशील. कसेतरी त्यांनी आपले प्राण धारण केले आहे. त्यांचा प्राणवायू त्यांच्या कंठाशी आला आहे, तेंव्हा अशा अवस्थेत त्या किती वेळ जिवंत राहू शकतील? मला माहीत नाही की त्या जिवंत राहू शकतील अथवा नाही. म्हणून तातडीने वृंदावनास जावे आणि त्यांच्या प्राणांचे रक्षण करावे. तेथे जाऊन त्यांना माझा संदेश द्यावा की मी निश्चितच उद्या किंवा परवा परत येईन. माझ्या प्रतीक्षेत त्यांनी प्राण धारण केलेले आहेत. त्या विचार करित असतील, 'श्रीकृष्णांनी सांगितले की ते येणार आहेत, ते खोटे नाही बोलू शकत.' याच आशेवर त्यांचे प्राण जणू फांदीवर टांगलेले आहेत, ती फांदी तुटल्यावर त्यांचे प्राण निघून जातील, तेंव्हा शीघ्र जावे."

हे 'मन्मना भव' चे सर्वोत्तम उदाहरण आहे. ही तर श्रीकृष्ण विरहात व्याकूळ गोपींची गोष्ट आहे.

आता एका दृष्टांताद्वारे (उदाहरणाद्वारे किंवा दाखल्याद्वारे) ऐका, कशा प्रकारे श्रीकृष्ण कोणाच्या हृदयाचे हरण करतात, आपण जाणतो की कुणाला आपले हृदय देणे किती कठीण असते, परंतु जर कुणी आपले हृदय घेतले तर हे अतिशय सहज होऊन जाते. अन्यथा आपण आपल्या हृदयाला देणे असमर्थ होऊन जाते. 'कठ–उपनिषद (१.२.२३)' मध्ये कथित आहे—

**नायमात्मा प्रवचनेन लभ्यो न मेधया न बहुना श्रुतेन।**
**यमवैष वृणुते तेन लभस्तस्यैव आत्मा विवृणुते तनु स्वाम्॥**

"या परमात्म वस्तूला तर्क (युक्ती), मेधा (बुद्धी) किंवा पांडित्य (विद्वत्ता)—यांच्याद्वारे जाणले जाऊ शकत नाही. जेव्हा जीवात्मा भगवंतांच्या प्रती सेवोन्मुख होऊन परमात्म्याच्या कृपेची याचना करतो, तेव्हा त्याच्या निकट ते परमात्मा आपला स्वयंप्रकाश श्रीविग्रह प्रकट करतात."

श्रीकृष्ण त्याच हृदयाला हरण करतील जे त्यांना प्रिय आहे.

जर आम्ही खरोखरीच त्यांना आमचे हृदय समर्पित करण्याची इच्छा करू, तरीसुद्धा ते अतिकठीण आहे, परंतु जर श्रीकृष्ण आमच्या हृदयाला हरण करण्याची इच्छा करतील तरच ते संभव होईल. परंतु आम्हाला आमच्या हृदय असे घडवायला हवे की जेंव्हा श्रीकृष्ण त्याला बघतील तेंव्हा त्यांना ते हरण करण्याचा लोभ उत्पन्न व्हावा. हृदय समस्त प्रकारे स्वच्छ आणि शुद्ध असायला हवे. जर त्यात थोडी जरी अशुद्धता राहिली तर श्रीकृष्ण त्याचा स्वीकार करणार नाहीत. परंतु केवळ हृदयाची शुद्धताच पर्याप्त (पुरेशी) नाही कारण ज्ञानीजनांचे हृदय देखील शुद्ध असते. त्या शुद्धतेत आपल्याला काही विशेष सुगंध मिश्रित करावयास हवेत; जेणेकरून जेव्हा श्रीकृष्ण त्याचा वास घेतील तेव्हा ते त्या सुगंधित हृदयाकडे आकर्षित होतील. तो सुगंध आहे भक्तिरसाचा, म्हणजे जेव्हा भक्तिरस हृदयात प्रवाहित होऊ लागतो तेव्हा कृष्ण अवश्य आकर्षित होतील. कृष्ण कशाप्रकारे हृदय हरण करतात, खालील कथेद्वारे याचे वर्णन केले गेले आहे—हा पूर्वरागातील गोपींच्या तन्मयतेचा प्रसंग आहे—

श्रीकृष्ण रोजच्या प्रमाणे त्याच्या सवंगड्यांबरोबर बासरी वाजवित गोचारणासाठी जात होते. त्यांचा वर्ण घनमेघाच्या वर्णासमान होता, त्यांचे कुरळे केस त्यांच्या मुख-मंडळावर रुळत होते, त्यावेळचे त्यांचे सखा चारी बाजूंनी "साधू! साधू!!" म्हणत श्रीकृष्णांच्या महिमेचे गान करित होते आणि आपापली बासरी आणि श्रृंग वाजवत होते. जेंव्हा अशा प्रकारे क्रीडा करीत वनात गमन करीत होते, तेंव्हा समस्त व्रजवासी त्यांच्या दर्शनासाठी त्यांच्या मार्गाच्या दोन्ही बाजूंना एकत्रित होत असे. माता यशोदा आणि नंदबाबा श्रीकृष्णांच्या मागेमागे चालताना सांगत होते-"पुत्रा! लवकर परत ये, जास्त दूर जाऊ नकोस." कृष्ण पुनःपुन्हा त्यांना लवकर परतून येण्याचे आश्वासन देत होते. शेवटी जेव्हा श्रीकृष्णांनी प्रतिज्ञापूर्वक सांगितले की 'मी अवश्य लवकरच परत येईन', तेव्हा नंद-यशोदा हळूहळू आपल्या घरी परतले.

व्रजमध्ये कित्येक नवविवाहित गोपी आल्या होत्या. त्या सर्व श्रीकृष्णांची एक झलक पहाण्यासाठी आपापल्या घरांच्या दरवाज्यात येत. कुणीकुणी गोपी खिडक्यातून डोकावून पाहात. कुणी गच्चीवर चढून पहात असत. श्रीकृष्णसुद्धा आपल्या डोळयांच्या कोनातून त्यांना न्याहाळत असत. एक गोपी दोनतीन दिवस आधीच लग्न होऊन आली होती. तिने आधीच गोचारणाला (गाई चारायला)

जाणाऱ्या श्रीकृष्णांच्या अतिशय मधुर रूपाविषयी ऐकले होते. तेंव्हा तिने श्रीकृष्णांच्या बासरीचा आवाज ऐकला तेंव्हा तिचे हृदय श्रीकृष्णांच्या दर्शनासाठी व्याकूळ आणि उत्कंठित झाले. जेंव्हा ती गोपी घराच्या दरवाज्यातून बाहेर आली तेंव्हा तिची सासू आणि नणंद दाराबाहेरच उभ्या होत्या. त्यांनी तिला श्रीकृष्णांचे दर्शन घेण्यापासून अडविले आणि म्हटले—"तू तेथे जाऊ नकोस. तेथे एक काळा साप आहे, जर त्याने तुला दंश केला तर तू जीवनभर त्याचे विष उतरवू शकणार नाहीस. म्हणून तू घरीच थांब. आम्ही आत्ता आलो."

ती गोपी म्हणाली—"तुम्ही दोघी जाणार आणि मी काय इथेच रहाणार? मी सुद्धा येणार."

"नाही. तुझ्यासाठी धोका आहे. तुझे हृदय अजून अपक्व (कोमल) आहे. तू ते चढलेले विष उतरवू शकणार नाहीस, तेंव्हा तू येथेच थांब."

व्रजच्या समस्त स्त्रिया, वृद्ध, बालक, बालिका, पक्षी, कीटक, पतंग सगळेच श्रीकृष्णांच्या दर्शनासाठी जात होते. श्रीकृष्णांना जवळ येतांना पाहून त्या गोपीची सासू आणि नणंद धावतच श्रीकृष्णांकडे गेल्या. जेंव्हा त्या दोघी निघून गेल्या तेंव्हा ती गोपी दरवाज्याच्या छिद्रातूनच श्रीकृष्णांना बघू लागली. त्यावेळेस तिची स्थिती अशी होती की ती बाहेर असलेल्या श्रीकृष्णांना पाहू शकत होती परंतु तिला मात्र कुणीच पाहू शकत नव्हते. श्रीकृष्णांची बासरी त्यांच्या ओठांवर होती, आणि ते इतक्या मधुरतेने तिचे वादन करीत होते की त्यांच्या हृदयातील अमृत त्या बासरीच्या छिद्रातून निघून समस्त व्रजभूमीला आप्लावित करीत होते (बुडवून टाकीत होते). ज्या डोळयांनी या रूप-माधुरीचे दर्शन नाही घेतले त्या डोळयांची आवश्यकताच काय? ज्या डोळयांनी या मधुर-लीलांचे दर्शन केले आहे केवळ तेच कृतार्थ आहेत. गोपी श्रीकृष्णांची आरती करीत होत्या, दिव्यांनी नव्हे तर आपल्या डोळयांनी. कशा प्रकारे? त्यांचे डोळे दिव्यांप्रमाणे होते आणि त्यांच्या हृदयात स्थिर असलेले प्रेम तूपासारखे होते. त्यांचे प्रेम-प्रज्वलित डोळे श्रीकृष्णांच्या चारी बाजूंना फिरत होते आणि प्रेमपूर्ण कटाक्षांद्वारे श्रीकृष्णांची आरती करीत होते. अतिशय आनंदपूर्वक, काहीशा लज्जेने श्रीकृष्णांनी त्यांच्या सगळयांच्या प्रेमाचा स्वीकार केला.

एवढे सगळे घडत असतानादेखील श्रीकृष्ण त्या नववधू गोपीच्या घराच्या दरवाजाकडे पहात होते. श्रीकृष्ण कुणाला दर्शन देऊ

शकतात आणि नाही सुद्धा, कारण ते स्वतंत्र भगवान आहेत, परंतु जर कुणी वास्तविकरीत्या त्यांच्या दर्शनासाठी उत्कंठित असेल, तर श्रीकृष्ण अवश्य त्याला दर्शन देतात. त्या दिवशी श्रीकृष्ण त्या नवविवाहित गोपीला दर्शन देऊ इच्छित होते. म्हणून ते सगळयांना सोडून तत्क्षणी तिच्याकडे जाऊ पहात होते. तेंव्हा श्रीकृष्णांनी युक्तिपूर्वक एका वासराचे शेपूट अशा प्रकारे धरून ओढले की ते वासरू धावत–उड्या मारीत सरळ त्या गोपीच्या घराच्या द्वाराशी जाऊन पोहोचले, जणू काही त्याला याच कामासाठी प्रशिक्षित केले गेले होते.

श्रीकृष्णदेखील वासराच्या मागोमाग तेथे पोहोचले. काही क्षणांपुरता श्रीकृष्णांनी तेथे आपली बासरी आपल्या ओठांवर ठेवली आणि त्या गोपीला आपल्या परम मनोहर त्रिभंग–रूपाचे दर्शन घडविले. मग काय! त्या गोपीचे हृदय आता तिच्या जवळ राहिलेच नाही. ते तर श्रीकृष्णांनी चोरले आणि ते पुन्हा आपल्या सवंगड्यांमध्ये मिसळून गेले. श्रीकृष्णांच्या जगत्–विमोहक (जगाला विशेष रूपाने मोहित करणाऱ्या) रूपाच्या (सौंदर्याच्या) दर्शनाने ती गोपी बाह्य–ज्ञान रहित होऊन तेथेच स्थिर झाली. यालाच श्रीकृष्णांद्वारे हृदय हरण करणे अथवा 'मन्मना भव' होणे म्हणतात.

जर श्रीकृष्णांची कुणावर विशेष कृपा होते तेंव्हाच ते त्याच्या हृदयाची चोरी करतात. जर आपण अत्यंत उत्कंठित होऊन आपल्या मनात सदैव चिंता करू की "कधी मी श्रीकृष्णाच्या रूप–माधुरीचे दर्शन प्राप्त करू शकेन?" यामुळे श्रीकृष्ण अतिप्रसन्न होऊन आपल्या चित्ताचे–हृदयाचे हरण करतील. त्या गोपीने हे सौभाग्य प्राप्त करण्यासाठीच लाखो वर्षे तपस्या केली होती आणि त्यादिवशी ती गोपी संपूर्णपणे कृतार्थ झाली.

खूप वेळ लोटला. श्रीकृष्ण आपल्या सवंगड्यांसोबत वनात पोहोचले होते आणि गाईंच्या खूरांद्वारे उडणारी धूळ देखील आता बसली होती. परंतु ती गोपी मात्र अजूनही त्याच स्थानी निश्चल पुतळयासाखी उभी होती. कारण तिचे हृदय आणि मन तिच्यापाशी राहिले नव्हते, ती असहाय्य झाली होती. तेवढ्यात तिची सासू तिच्याकडे आली आणि तिला गदागदा हलवीत म्हणाली—"शेवटी तेच झाले ना ज्याची मला भीती होती! त्या काळया सापाने तुला दंश केलाच तर. आता त्याचे विष तू कधीच उतरवू शकणार नाही." सासू तिला आपल्याबरोबर घरात घेऊन आली आणि तिला दही मंथन करण्यास (रवीने दही घुसळण्यास) सांगितले, जेणेकरून

काही दैहिक क्रिया केल्याने तिला पुन्हा बाह्य–ज्ञान प्राप्त होईल. परंतु त्या गोपीने दह्याच्या मडक्याऐवजी तेलाचे मडके उचलले आणि ते घेऊन ती मंथन करू लागली, ज्यामुळे कर्कश ध्वनी होऊ लागला. पूर्ण बाह्य–ज्ञान नसल्या कारणाने कधी ती मोहरीच्या दाण्यांचे मंथन करीत असे, तर कधी थांबून जात असे. तिचे मन आणि हृदय ताळयावर होते कुठे? श्रीकृष्णांनी त्यांचे हरण केले होते. तो कर्कश ध्वनी ऐकून तिची सासू तेथे आली आणि म्हणाली, "अगं! हे काय करते आहेस?" तेंव्हा सासूने तिचे मंथन करणे थांबविले आणि एकावर एक असे तीन मातीच्या कळश्या (घागरी) तिच्या डोक्यावर ठेवले. तिच्या एका हातात पाणी भरण्यासाठी दोर आणि दुसऱ्या हातात एक लहान बाळ दिले आणि तिला विहिरीतून पाणी आणायला सांगितले. ती नववधू विहिरीवर पोहोचली आणि पाणी भरण्यासाठी तिला घागरीला दोर बांधायचा होता. परंतु तिचे चित्त तिच्यापाशी नसल्यामुळे ती घागरीच्या जागी त्या तान्ह्या बाळाच्या गळयाला दोर बांधू लागली. हे पाहून जवळच उभ्या असलेल्या अन्य गोपी म्हणाल्या, "हाय रे देवा! ही काय करीत आहे?" आणि असे म्हणून त्यांनी तिचा हात पकडला आणि बाळाला वाचविले. एक गोपी म्हणाली, "हिला झाले तरी काय आहे? असे वाटते की हिला भूतबाधा झाली आहे." दुसरी गोपी जी सर्व जाणत होती ती म्हणाली, "हिला भुताने नव्हे, हिला श्रीनंद महाराजांच्या 'पूता'ने (पुत्राने म्हणजेच मुलाने) झपाटले आहे." हेच आहे "मन्मना भव" चे उदाहरण.

वृंदावन केवळ त्या लोकांसाठी आहे जे आपले मन आणि हृदय आपल्या घर–परिवाराला देण्यास असमर्थ आहेत. ते या सर्वांना रडत सोडून अनाश्रितासमान (आश्रय नसलेल्या व्यक्तींप्रमाणे) वृंदावनात येतात आणि केवळ श्रीकृष्णांसाठी क्रंदन (विलाप) करतात. एवढेच काय पण राजा–महाराजा आणि ऐश्वर्ययुक्त धनवान लोकांचे सुकुमार पुत्र आणि कन्या (मुले आणि मुली) देखील वृंदावनात येऊन श्रीकृष्णांना आपले मन आणि हृदय अर्पण करून भजन करतात.

श्रीकृष्ण अर्जुनांना म्हणाले—"मन्मना भव" म्हणजे आपल्या चित्ताला गोपींप्रमाणे माझ्या चरणी अर्पण करा."अर्जुनांनी उत्तर दिले —"प्रभो! या रणांगणात माझे चित्त तुमच्यात निविष्ट करणे कशा प्रकारे संभव आहे? आपण मला पितामह भीष्म, द्रोणाचार्य आणि कर्णाविरुद्ध युद्ध करण्यास सांगितले आहे. तेंव्हा माझ्यासाठी 'मन्मना

भव' शक्य नाही."

तेंव्हा श्रीकृष्ण म्हणाले—**"मद्भक्तो"**—माझे भक्त बना.




भगवान श्रीकृष्ण अर्जुनांना म्हणाले—"कर्तेपणाच्या अभिमानाने रहित चित्ताद्वारे सर्व कर्मे मला समर्पित करून आणि माझ्या परायण होऊन निश्चयात्मिका बुद्धिरूप योगाचा आश्रय करून सर्वदा माझ्यात चित्त असणारे बना."

*(गीता १८/५७)*

# सहावा परिच्छेद

आत्तापर्यंत श्रीमद्भगवद्‌गीतेचा सर्वोत्कृष्ट आणि सर्वगुह्यत्तम (सर्वात गोपनीय) श्लोक **'मन्मना भव'**ची व्याख्या आरंभ करून उदाहरणांसह हे सांगितले गेले आहे की 'मन्मना भव' काय आहे? ज्या प्रकारे युद्धक्षेत्रात अर्जुनांना भगवान श्रीकृष्णांद्वारे हा उपदेश दिला गेला. त्याचप्रमाणे आपण सारे देखील युद्धाच्या मैदानात उभे आहोत. आपली लढाई आहे, स्वभावतः चंचल मनाच्या वृत्तींशी. त्यावेळेस कुरुक्षेत्रात कौरव आणि पांडवांमध्ये युद्ध सुरू होते. म्हणून ज्याप्रमाणे हे 'मन्मना भव' अर्जुनासाठी दुष्कर होते, त्याचप्रमाणे आपल्यासाठी सुद्धा दुष्कर आहे.

पांडवांची सेना सात अक्षौहिणी आणि कौरव सेना अकरा अक्षौहिणी होती. आमच्यासमोर सुद्धा आज अकरा (एकादश) इंद्रिय–स्वरूप एकादश अक्षौहिणी सेना आहे आणि आपण सर्वथा एकटे आहोत. भगवान श्रीकृष्ण अर्जुनाचे रथ–चालक (सारथी) होते, परंतु आम्ही मात्र आपल्या विकृत बुद्धीद्वारे प्रचलित आहोत. अर्जुनाकडे अग्निदेवांद्वारे प्रदत्त रथ होता, जो जाळता येणे किंवा नष्ट करणे शक्य नव्हते, परंतु आमच्याकडे कोणता रथ आहे? मात्र हे भौतिक शरीर, जे व्याधिग्रस्त आणि नश्वर आहे. अर्जुनांकडे युद्धासाठी गांडीव नामक धनुष्य होते, पण आपल्याकडे काय आहे? आपण सर्वथा असहाय्य आणि एका दयनीय अवस्थेत आहोत. अर्जुनांच्या रथाच्या ध्वजावर (झेंड्यावर) कोण विराजमान होते? श्री हनुमानजी विराजमान होते! जरी अर्जुनांना सर्व प्रकारचे सहाय्य उपलब्ध होते, तरीसुद्धा त्यांचे मन विचलित झाले आणि ते म्हणाले, "हे प्रभो! मी 'मन्मना भव' होण्यास असमर्थ आहे."

हे शरीर म्हणजे रथ आहे; आत्मा रथी आहे आणि मन रथवाहक (स्वरूप) आहे. पण मनाचा स्वभाव काय आहे? चंचलता. त्याने आपल्याला कुठलीच मदत मिळत नाही. या चंचल मनाच्या निर्देशनामुळे आम्ही पतित किंवा पथभ्रमित होऊन जातो (मार्ग चुकतो).

सर्वप्रथम अर्जुनांनी करबद्ध होऊन (हात जोडून) सांगितले—

**कार्पण्यदोषोपहतस्वभावः**
**पृच्छामि त्वां धर्मसंमूढचेताः।**
**यच्छ्रेयः स्यान्निश्चितं ब्रूहि तन्मे**
**शिष्यस्तेऽहं शाधि मां त्वां प्रपन्नम्॥**

*(गीता २/७)*

"स्वाभाविक शौर्यधर्माचा परित्याग करून भित्रेपणारूप धर्माने अभिभूत (व्याकूळ), धर्माच्या निरूपणात मोहित चित्त असलेला मी आपल्याला विचारतो—माझ्यासाठी जे मंगलकारी आहे, ते निश्चित करून आपण सांगा. मी आपला शिष्य आहे. म्हणून मला शरणागताला आपण शिकवण प्रदान करा."

"हे प्रभो! सर्व प्रकारे मी आपली शरण ग्रहण करतो आहे. आपण जसा आदेश द्याल, मी तेच करीन." अर्जुनांनी भगवान श्रीकृष्णांचे दिलेले सर्व निर्देश ऐकले आणि मग म्हटले की हे 'मन्मना भव' माझ्यासाठी संभव नाही. मी माझ्या मनाला तुमच्यात कसा आविष्ट करू शकेन? हे संभव नव्हे. कारण माझ्यासमोर भीष्म, द्रोण, कर्ण, कृपाचार्य, दुर्योधन आणि दुःशासन यांच्या सोबतच अनेक महारथी युद्धासाठी एकत्रित झाले आहेत.

अशा प्रकारे आमच्या समोर सुद्धा सहा महारथी उभे आहेत. ते कोण आहेत? वाणीचा वेग (बोलण्याचा आवेग), जिव्हावेग (जिभेचा आवेग), उदरवेग (पोटाचा आवेग), उपस्थवेग (जननेन्द्रियांचा आवेग), मनाचा वेग आणि क्रोधवेग (रागाचा आवेग). आम्ही यापैकी कुणा एकाचा पराभव करण्यास आम्ही अत्यंत असमर्थ आहोत. विश्वामित्र आणि नारद मुनींसारख्या महान व्यक्तीसुद्धा यापैकी एका वेगाद्वारे—उपस्थ-वेगाद्वारे (कामवासनेच्या आवेगाद्वारे) प्रभावित झाल्या होत्या.

एकदा श्रीनारद मुनी हिमालय पर्वतावर गंगेच्या किनारी एका अत्यंत मनोरम स्थानी पोहोचले. त्या रमणीय स्थळी थांबून ते आपल्या स्वाभाविक निर्मळ मनाने श्रीहरींचे स्मरण करू लागले आणि त्यांची समाधी लागली. श्रीनारद मुनींची ही तपोमयी स्थिती पाहून इंद्र घाबरले की 'आपल्या तपस्येच्या बळावर हे माझे अमरावतीचे राज्य बळकावणार तर नाही ना?' त्यांनी कामदेवांना बोलावून सांगितले, "तुम्ही आपल्या मदतनीसांसहित (सहकाऱ्यांसोबत) जा आणि श्रीनारद मुनींची समाधी भंग करा." श्रीनारद मुनींच्या आश्रमात जाऊन कामदेवांनी आपल्या मायेने वसंत ऋतू उत्पन्न करून कामाग्नी (काम-वासनेची आग) भडकेल असे वातावरण निर्माण केले. कामकलेत निपुण नवयुवतींचा समुदाय अनेक प्रकारच्या शास्त्रीय रागदारीवर आधारित ताना आणि आलाप घेत गाऊ लागला. तसेच हातात चेंडू घेऊन विभिन्न प्रकारचा खेळ सुद्धा त्या खेळू लागला. परंतु कामदेवांची कुठलीही कला मुनींवर प्रभाव पाडू शकली नाही. मग मात्र कामदेव आपल्या विनाशाच्या

भीतीने घाबरले आणि श्रीनारद मुनींच्या चरणी पडून क्षमा मागू लागले. श्रीनारद मुनींना क्रोध आला नाही. आणि काही प्रिय वचन (शब्द, उक्ती) बोलून त्यांनी कामदेवांचे समाधान केले. परंतु श्रीनारद मुनींच्या मनात कामदेवांना जिंकण्याचा अभिमान निर्माण झाला आणि त्यांनी गर्वयुक्त होऊन ही बातमी श्रीशंकरांना जाऊन ऐकविली. श्रीशंकर म्हणाले, "तुम्ही मला सांगितले ते ठीक आहे, परंतु श्रीहरींना ही गोष्ट अजिबात सांगू नका. जरी चर्चेत हा विषय निघाला तरी ही गोष्ट लपवा." श्रीनारद मुनींना श्रीशंकरांची शिकवण (धडा, बोध) रुचली नाही. हातात वीणा घेऊन श्रीहरींचे गुणगान करीत ते वैकुंठात श्रीनारायणांपाशी पोहोचले. त्यांनी कामदेवांचे सारे चरित्र भगवंतांना ऐकवले. करुणानिधान (करुणेचा अथांग सागर असलेल्या) भगवंतांनी मनात विचार करून पाहिले की "यांच्या मनात 'गर्व' रूपी विशाल अवाढव्य वृक्षाचा अंकुर फुटला आहे. मी तो उपटून टाकीन कारण सेवकांचे हित करणे हा माझा पण आहे (ही माझी प्रतिज्ञा आहे)." आपल्या हृदयात अभिमान वृद्धिंगत करून श्रीनारद मुनी तिथून निघून गेले.

तेव्हा मग लक्ष्मीपती भगवंतांनी आपल्या मायेला प्रेरित केले. त्या श्रीहरींच्या 'माया' नामक शक्तीने रस्त्यातच एका अत्यंत सुंदर नगरीची रचना केली. त्या नगरीत 'शीलनिधी' नामक राजा होता. त्याचा वैभव-विलास शंभर इंद्रांसमान होता. त्याला 'विश्वमोहिनी' नामक एक रूपवती कन्या होती, जिचे स्वयंवर होणार होते. श्रीनारद मुनी त्या नगरीतील राजमहालात पोहोचले. राजाने आपल्या रूपवती कन्येला बोलाविले आणि तिच्या स्वयंवराच्या आयोजनाची माहिती श्रीनारद मुनींना दिली. त्या राजकुमारीचे सौंदर्य पाहून मुनी आपले वैराग्य पार विसरून गेले आणि बराच वेळ त्या कन्येकडे पहात राहिले. मनोमन विचार करू लागले की 'असा कोणता उपाय करू की ही कन्या स्वयंवरात मलाच पती म्हणून स्वीकार करेल. अशा प्रसंगी जप आणि तपाने काहीच प्राप्त शकत नाही. मला तर आता अतिशय रम्य कांती आणि अत्यंत सुंदर राजबिंडे रूप हवे आहे, जेणेकरून ही राजकुमारी माझ्यावर भाळेल. तसेच मोहित होऊन ती माझ्याच गळयात जय-माळ टाकेल.' असा विचार करित-करित ते त्या स्थानातून निघून गेले. त्यावेळी श्रीनारद मुनींनी भगवान नारायणांना अनेक प्रकारे विनंती केली. लीलामय कृपाळू प्रभू प्रकट झाले. श्रीनारद मुनींनी अतिशय हीनदीन होऊन सर्व वृत्तांत त्यांना ऐकवला आणि म्हणाले, "हे प्रभो! आपण

आपले रूप मला प्रदान करा, कारण अन्य कुठल्याही उपायाने मी ती राजकन्या प्राप्त करू शकणार नाही."—

**जेहि बिधि नाथ होइ हित मोरा।**
**करहु सो बेगि दास मैं तोरा॥**

आपल्या मायेचे विशाल बळ पाहून प्रभू हसतच म्हणाले—"हे नारद मुनी! ऐका, ज्यामुळे आपले परम-हित होईल, आम्ही तेच करू. हे मुनी! रोगाने व्याकूळ रोगी जर कुपथ्य मागू लागला, तर वैद्य ते कुपथ्य त्यास देत नाही. मी देखील तुझे हित करण्याचा निश्चय केला आहे." असे म्हणून भगवान अंतर्धान पावले.

मायेने वशीभूत झालेले श्रीनारद मुनी इतके मूढ झाले की भगवंतांची निगूढ (रहस्यमय, अतिशय गुप्त, गोपनीय) वाणी ते समजूच शकले नाहीत. त्यांनी लगेच स्वयंवर-भूमीकडे प्रस्थान केले. राजेमहाराजे खूपच सजूनधजून आपल्या गोतावळयासहित (समुदायासोबत) आपापल्या आसनांवर बसलेले होते. श्रीनारद मुनी मनोमन प्रसन्न होत होते की माझे सुंदर रूप पाहून राजकन्या चुकूनसुद्धा दुसऱ्या कोणास स्वीकार करणार नाही. कृपानिधान (कृपेचा सागर असलेल्या) भगवंतांनी मुनींच्या कल्याणाकरिता त्यांना माकडाचा कुरूप चेहरा दिला होता. राजकुमारीने सभेत प्रवेश केल्यावर श्रीनारद मुनी तिच्या अगदी समोर उभे राहिले. त्यांचे ते माकडासारखे मुख आणि भयंकर शरीर पाहून ती तोंड फिरवून राजहंसीच्या चालीने पुढे चालत गेली. श्रीनारद मुनी वारंवार उचकत होते (उड्या मारत होते) आणि तळमळत होते (प्रयत्न करत होते), परंतु राजकुमारीने त्यांच्याकडे पाहिलेसुद्धा नाही. त्याचवेळी श्रीनारायणदेखील राजाचे शरीर धारण करून तेथे आले. राजकुमारीने हर्षित होऊन त्यांच्या गळयांत जयमाला घातली आणि भगवान आपल्या वधूला सोबत घेऊन निघून गेले. मोहामुळे श्रीनारद मुनींची बुद्धी नष्ट झाली होती, राजकुमारीला अशी जातांना पाहून ते अत्यंत विकल झाले. तेथेच श्रीशंकरांचे दोन गण (परिकर) देखील ब्राह्मण वेशात बसले होते, ते हसून म्हणाले —"अहो, जरा जाऊन आरशात आपले तोंड तरी बघा!" श्रीनारद मुनींनी पाण्यात डोकावून आपल्या चेहऱ्याचे प्रतिबिंब न्याहाळले. प्रतिबिंबात माकडाचा चेहरा पाहून ते अत्यंत क्रोधित झाले आणि त्यांनी भगवान श्रीहरींना अनेक खरेखोटे शब्द ऐकविले, येथपर्यंत की अगदी शाप सुद्धा देऊन टाकला! प्रभूंनी लगेचच आपली माया हटविली. आता मात्र श्रीनारद मुनींची बुद्धी ताळयावर आली

आणि त्यांनी विचार केला, "हे मी काय करून टाकले?" त्यांनी अतिशय भयभीत होऊन श्रीहरींचे चरण पकडले.

या महारथींच्या व्यतिरिक्त आम्हाला सुद्धा अनेक प्रकारच्या अनर्थांचा सामना करावयास लागतो. म्हणून श्रीभगवान म्हणतात, "'मद्भक्तो'—तुम्ही माझे भक्त बना." अर्जुनांनी विचार केला आणि म्हणाले की 'मी भक्त होईन'—असे म्हणणे फार सोपे आहे, परंतु वास्तवात असे करू शकणे अत्यंत कठीण आहे.

भक्त बनण्यासाठी हे विशेषतः आवश्यक आहे की—

**अन्याभिलाषिता शून्यं, ज्ञानकर्माद्यनावृत्तम्।**
**आनुकुल्येन कृष्णानुशीलनं भक्तिरुत्तमा॥**

*(भक्ति-रसामृत-सिंधू १.१.११)*

साधकाच्या मनात कुठल्याही प्रकारची भौतिक इच्छा नसावी. भगवान श्रीकृष्ण किंवा त्यांच्या शुद्ध भक्तांची सेवा आणि भक्ती लाभ करण्याव्यतिरिक्त हृदयात कुठल्या अन्य अभिलाषेचा गंधसुद्धाही नसावा. अन्याभिलाषेची (इतर अभिलाषेची किंवा इच्छेची) तर गोष्टच सोडा, पण तिचा गंधसुद्धा असणे वर्जित आहे. या विचारांना लक्ष देऊन ऐका आणि तसे आचरण करण्याचा प्रयत्न करा, तेव्हाच भक्तीचे तत्त्व तुम्ही समजू शकाल. अन्यथा हे खूप कठीण आहे. हृदय, ज्ञान आणि कर्माच्या प्रवृत्तींपासून शून्य (रहित) व्हायला हवे.

कोणतीही व्यक्ती कर्माशिवाय जीवित राहू शकत नाही. ती काहीनाकाही कर्म तर करतेच. इतकेच काय पण झोपेतही आम्ही कर्मरत असतोच. जसे—श्वास घेणे, कूस बदलणे आणि स्वप्न पहाणे. हे सर्व काही कर्माच्या अंतर्गतच मोडते. तेव्हा कर्म अपरिहार्य आहे, कर्माशिवाय आपण एक क्षणसुद्धा जीवित राहू शकत नाही. जर कुणी असे म्हणत असेल की तो कुठलेही कर्म केल्याशिवाय जिवंत आहे, तर तो पाखंडी आहे. कर्म तर आम्हाला करावेच लागते. आम्हाला भोजन करावेच लागते आणि स्वतःला थंडीपासून वाचविण्यासाठी उबदार कपडे पण घालावेच लागतात. पण आम्ही आमच्या भक्तीला कर्माने आवृत होण्यापासून कसे वाचवू शकू? जर कार्य करताना आम्ही भगवंताचे स्मरण ठेवले, जसे आम्ही भगवद्-सेवेच्या अभिलाषेने (भगवंतांची सेवा करण्याच्या इच्छेने) भोजन ग्रहण केले तर हे कार्य आमच्या भक्तीला आच्छादित करू शकणार नाही.

आमच्या वर्तमान स्थितीत आम्हास ज्ञानाशिवाय जीवित राहणे देखील अशक्य आहे. ज्ञानही आवश्यकच आहे कारण ज्ञानाशिवाय आम्ही हेदेखील जाणू शकणार नाही की चालतांना पाय कोठे ठेवायला हवा आणि आम्ही खाली पडू.

परंतु या गोष्टी (ज्ञान आणि कर्म) भक्तीला कशाप्रकारे आच्छादित करू शकतात? पहा, (येथे भरत महाराजांचा वृत्तांत प्रस्तुत करण्यात येत आहे—) दुसऱ्यांची मदत करण्याची कृती करताकरता भरत महाराजांकडून एक चूक झाली आणि त्यांचे भक्तीच्या मार्गातून पतन (स्खलन) झाले. साधन-भक्ती करताकरता त्यांनी भक्तीची एक उच्च दशा, 'भाव-दशा' प्राप्त केली होती. त्यांनी एका हरिणीच्या नवजात पाडसाचे (शिशूचे) सिंहापासून रक्षण केले आणि त्याला नदीत बुडण्यापासून वाचविले. नंतर दूध इत्यादी पाजून त्याचे पालन-पोषण केले. हे सगळे त्यांनी एका असहाय्य जिवाच्या मदतीसाठी केले. परंतु हळूहळू त्यांची त्या हरिणात इतकी आसक्ती निर्माण झाली की ते भगवंतांचे भजन जवळपास विसरूनच गेले. या कर्मामुळे त्यांना आणखी तीन वेळा जन्म ग्रहण करावा लागला.

म्हणून ज्ञान आणि कर्म सर्वदा वर्तमान असूनसुद्धा त्यांना नेहमी भक्तीच्या अधीनच ठेवावयास हवे. अन्यथा आमची भक्ती त्यांच्याद्वारे आच्छादित होऊन जाईल. तर ज्ञान आणि कर्माचा वापर (उपयोग) कसा करावा? (उदाहरणार्थ) विग्रह सेवेसाठी बाजारात जाऊन आम्हाला उत्तमोत्तम फळे आणि भाज्या आणायला हव्यात. भगवान (श्रीविग्रहांच्या रूपात) भोग (नैवेद्य) ग्रहण करतील. मग सर्वांना तो महाप्रसाद वितरण करावा. यामुळे भक्ती आच्छादित न होता, उलट वृद्धिंगत होईल.

याच्या विपरीत एखादा उत्तम पदार्थ संग्रहित करून जर आपण आपल्या इंद्रियतृप्तीसाठी एखादे स्वादिष्ट व्यंजन (पक्वान्न किंवा खाद्यपदार्थ) तयार करतो, तर ते व्यर्थ आहे आणि हे कार्य आमची भक्ती आच्छादित करून टाकेल. म्हणून आम्हाला अत्यंत सावधान रहायला हवे.

जर एखादे व्यंजन असा विचार करून तयार केला जातो की याला मी बनविले आहे, मीच याच्यासाठी लागणारी आवश्यक सामग्री एकत्रित केली आहे, धनसुद्धा संग्रहित केले आहे, आणि मीच याचा भोग करीन आणि मग ते भगवंतांना अर्पण केले गेले,

तर ते पूर्णतः अयोग्य आहे. केवळ खाद्य-पदार्थ अथवा पक्वान्न बनविल्यानंतरच नाही तर ते बनविण्याच्या प्रारंभिक क्रियेपासूनच आम्हाला ते भगवंतांना अर्पण करायला हवे. यथा—

**यज्ञार्थात्कर्मणोऽन्यत्र लोकोऽयं कर्मबन्धनः।**
**तदर्थं कर्म कौन्तेय मुक्तसङ्गः समाचर॥**

*(गीता ३.९)*

"हे कुंतीनंदन! श्रीविष्णूंसाठी अर्पित निष्काम कर्माव्यतिरिक्त अन्य कर्मांद्वारा मनुष्याला कर्मबंधन प्राप्त होते. म्हणून तुम्ही फळाची आकांक्षा सोडून भगवान विष्णूंच्या उद्देशाने कर्माचे उत्तम रितीने आचरण करा."

तुमचे प्रत्येक कार्य भगवंताच्या सेवेसाठी (यज्ञार्थ) असावयास हवे. हा सर्व भगवद्गीतेचा उपदेश आहे. तुम्ही जे खाता अथवा पिता, ते सर्व यज्ञार्थच (यज्ञासाठीच) असायला हवे.

**यत्करोषि यदश्नासि यज्जुहोषि ददासि यत्।**
**यत्तपस्यसि कौन्तेय तत्कुरुष्व मदर्पणम्॥**

*(गीता ९.२७)*

"हे कौन्तेय! तुम्ही ज्या कर्माचे अनुष्ठान करता, जे काही भोजन करता, जे होम करता, जे दान करता आणि जे पण तप करता, ते सर्व मला समर्पण करा."

तुम्ही जे काही करता, भोजन बनविता, यज्ञ करता, तपस्या करता, दान करता, ते सर्व काही श्रीविग्रहांच्या सेवेसाठीच व्हायला हवे. साधारणतः जगभरातले धार्मिक व्यक्तिगण याच प्रकारे कर्मरत आहेत. परंतु श्रीचैतन्य महाप्रभू आणि गौडीय आचार्यांनी शिकविले आहे की आपण अशा प्रकारे कर्म करू नये. त्यामुळे आपण बंधनातच पडू. प्रथम आम्ही स्वतःलाच भगवंतांच्या चरणी समर्पित करावयास हवे. तेव्हा आम्ही जे काही खाऊ किंवा करू, ते भगवंतांच्या सेवेसाठीच होईल.

**श्रवणं कीर्तनं विष्णोः स्मरणं पादसेवनं**
**अर्चनं वन्दनं दास्यं सख्यम् आत्मनिवेदनम्।**
**इति पुंसार्पिता विष्णौ भक्तिश्चेन्नवलक्षणा**
**क्रियेत भगवत्यद्धा तन्मन्येऽधीतमुत्तमम्॥**

*(श्रीमद्भागवत ७.५.२३-२४)*

भगवान श्रीकृष्णांच्या दिव्य नामाचे, गुणांचे, रुपाचे, लीलांचे श्रवण आणि कीर्तन करणे, त्यांचे स्मरण करणे, त्यांच्या चरणांची सेवा करणे, त्यांची पूजा करणे, त्यांना वंदन करणे, 'मी त्यांचा

दास आहे'—या भावाने त्यांची सेवा करणे, त्यांचे प्रिय मित्र होणे आणि संपूर्ण रूपात स्वतःला त्यांच्या चरणी समर्पित करणे, ही नवविधा भक्ती आहे. साधारणतः या जगातले लोक यापासून अनभिज्ञ आहेत. ते केवळ हा विचार करतात की त्यांनी भगवंताला काही वस्तू भेट करायला हव्यात, परंतु शुद्ध भक्त या कृतीच्या असंपूर्णतेशी परिचित आहेत. म्हणून सर्वप्रथम आम्हा सर्वांना स्वतःलाच समर्पित करावयास हवे, केवळ आपल्या कर्माच्या फळांनाच नव्हे. कर्मयोगाचे पालन करणारेच असे (कर्मफळाचे समर्पण) करतात.

हे असेच आहे जसे एक छोटा बालक आपल्या वडिलांच्या मांडीवर बसून काहीतरी खात आहे. कोणतीही खाद्य-वस्तू दिसताच (मिळताच) ते बालक ती वस्तू स्वतःच्या तोंडात घालते आणि नंतर आपल्या वडिलांच्या तोंडातही घालते. वडील बालकाच्या या व्यवहाराने कुपित होत नाहीत, उलट प्रसन्न होतात. का बरे? कारण बालक सर्वथा वडिलांवरच आश्रित (अवलंबून) आहे. वडील मुलाला शिक्षा देखील देतात, परंतु तरीही ते मूल वडिलांना सोडत नाही.

भगवंतांसोबत अशाप्रकारे संबंधयुक्त होण्यासाठी सर्वप्रथम आम्हाला आमच्या गुरुदेवांना सर्वस्व समर्पित करावयास हवे. वर्तमान स्थितीत तेच आमच्यासाठी भगवंतांच्या समान आहेत. जेव्हा आपण भगवंताशी साक्षात संबंधयुक्त होऊन जाऊ तेव्हा औपचारिकतांची (वरपांगी किंवा दिखाऊ कृतींची) आवश्यकताच भासणार नाही. (उदाहरणस्वरूप) गोपी स्वतः भोजन करतात आणि स्वतःला सुसज्जित (अलंकृत आणि सुशोभित) देखील करतात, परंतु औपचारिकतावश (भगवान) श्रीकृष्णांना काही भेट देत नाहीत (निवेदन करीत नाहीत) किंवा त्यांची पूजा करीत नाहीत. सुंदर वेषभूषा धारण करतांना त्या अनेक प्रकारची आभूषणे घालतात, परंतु हे सगळे कुणासाठी? हे सगळे त्या श्रीकृष्णांच्या प्रसन्नतेसाठीच करतात. त्यांचे सर्वस्वच स्वभावतः श्रीकृष्णांच्या सेवेसाठीच आहे. अशाप्रकारे आम्हाला सर्व काही एकमात्र श्रीकृष्णांच्या प्रसन्नतेसाठीच करावयास हवे. अशी भक्ती दुष्प्राप्य आहे (प्राप्त करणे कठीण आहे) आणि याकरिता पूर्वजन्मातील अनेकानेक सुकृतींचे (पुण्यांचे) पुंज असणे देखील आवश्यक आहे. परंतु या जन्मातदेखील जर भगवंतांच्या कृपेने आम्हाला शुद्ध वैष्णवांचा संग प्राप्त करण्याचे सौभाग्य मिळाले तर शुद्ध भक्ती

निश्चितच उदित होईल.

श्रीबिल्वमंगल ठाकुरांची कथा याचे एक उपयुक्त उदाहरण आहे. त्यांचा जन्म दक्षिण भारतात कृष्णा–वेण्वा नदीच्या तटावरील एका गावी झाला होता. ते वेदवेदांत इत्यादींचे प्रकांड पंडित होते, तथापि चिंतामणी नामक एका वेश्येप्रती अत्याधिक आसक्त होते.

एकेकाळची गोष्ट आहे—रात्रीची वेळ होती, घनघोर वृष्टी होत होती. परंतु चिंतामणींना भेटण्यासाठी ते इतके अधीर झाले की कुठल्याही गोष्टीची पर्वा न करता तिला भेटण्यासाठी निघाले. रस्त्यात एक नदी आडवी येत असे. पुरामुळे त्या भयानक रात्री उफाळत्या नदीने साक्षात काळाचे स्वरूप धारण केले होते. नदी पार करण्याचे अशावेळेस कुठलेच साधन देखील नव्हते. बिल्वमंगलांनी नदीच्या किनाऱ्याने वाहत चाललेल्या एका सडलेल्या प्रेताची नाव बनवून पोहत नदी पार केली. जेव्हा ते चिंतामणींच्या घरी पोहोचले, तेव्हा तिचे घर बंद होते. कुंपणाच्या भिंतींवरून लटकणाऱ्या सापाला दोरी समजून, त्याच्या मदतीने ते भिंतीवर चढले, परंतु भिंतीच्या दुसऱ्या बाजूला पाय घसरल्यामुळे ते कुंपणाच्या आत पडून बेशुद्ध झाले. काहीतरी पडण्याच्या आवाज ऐकून आपल्या सखींबरोबर (मैत्रिणींबरोबर) चिंतामणी बाहेर आल्या आणि विद्युत–प्रकाशात (आकाशात चमकणाऱ्या विजेच्या प्रकाशात) बिल्वमंगलांना पाहिल्यावर त्यांना सारी गोष्ट समजली. चिंतामणींनी स्वतःच धिक्कारित बिल्वमंगलांना देखील खूप फटकारले. त्या म्हणाल्या की "तुमची जितकी आसक्ती माझ्यात आहे, जर तितकी आसक्ती श्रीकृष्णांच्या चरणी असती, तर निश्चितच तुमचे कल्याण झाले असते." चिंतामणींचे ते हृदयस्पर्शी बोल ऐकून बिल्वमंगलांचे डोळे उघडले आणि ते तेथून थेट वृंदावनाच्या दिशेने निघाले.

रस्त्यात त्यांना तहान लागली. जेव्हा ते एका गावातून चालले होते, तेव्हा एका स्त्रीला विहिरीतून पाणी शेंदतांना पाहिले. ते पाणी पिण्यासाठी तेथे गेले, परंतु त्या स्त्रीच्या रूपावर मुग्ध झाले. त्या स्त्रीच्या मागेमागे तिच्या घरापर्यंत जाऊन पोहोचले.

स्त्रीच्या पतींनी साधू समजून सन्मान देत त्यांना आत बसविले. बिल्वमंगलांनी त्यांना आपल्या पत्नीला बोलाविण्याचा आग्रह केला. पतींच्या सांगण्यामुळे ती स्त्री बाहेर आली. बिल्वमंगलांनी तिच्याकडे तिच्या केसांत खोवलेल्या सुया मागितल्या. स्त्री आणि तिच्या पतींनी विचार केला की "हे भ्रमणशील साधू आहेत, कदाचित त्यांच्या पायात काटा रुतला असावा, ज्याला ते काढू इच्छितात." त्यांनी

सुया दिल्या. बिल्वमंगलांना काटा तर अवश्य काढायचा होता, परंतु तो काटा त्यांच्या हृदयात होता. तेथपर्यंत ते पोहोचू शकत नव्हते. म्हणून त्यांनी सुया घेतल्या आणि आपले दोन्ही डोळे फोडून घेतले. 'जर बांबूच उरला नाही तर बासरी तरी कशी वाजेल?' हे नेत्र या जड (निर्जीव, भौतिक) जगतात आपल्या आसक्तीचे मूळ कारण आहेत, कारण स्त्रीचे रूप पुरुषाला आणि पुरुषाचे रूप स्त्रीला आकर्षित करते. हे दोन्हीही मायेचे मूर्तिमंत स्वरूप आहेत. म्हणून श्रीमद्भागवत आणि अन्य शास्त्र याविषयी विशेष सावधान रहाण्याकरिता आम्हाला निर्देश देतात.

डोळयातून अविरत रक्त प्रवाहित होत होते. तेथून नेत्रविहीन होऊन ते वृंदावनाकरिता पुन्हा चालू लागले, परंतु त्यांचे हृदय पवित्र झाले होते. थोडे दूर गेल्यानंतर त्यांच्याजवळ एक बालक आले. त्या बालकाने अतिशय मधुर स्वरात त्यांना विचारले, "बाबा! आपण कोठे चालला आहात?" बिल्वमंगलांनी उत्तर दिले, "मी वृंदावनाला चाललो आहे." बालक म्हणाले, "मी सुद्धा वृंदावनाला चाललो आहे. आपण माझी ही काठी पकडा." ते बालक दुसरे कुणी नसून स्वतः मुरली–मनोहर श्रीकृष्ण होते.

ते दोघेही सोबतच चालू लागले आणि चालत चालत वृंदावनात येऊन पोहोचले. मार्गात काय झाले? बिल्वमंगलांना आपल्या हृदयात भगवान श्रीकृष्णांच्या संबंधी अनेक तत्त्वांची अनुभूती (स्फूर्ती) झाली, जी अमृततुल्य होती. याचेच नाव 'साधना' आहे. बिल्वमंगल ठाकूर एक साधक होते. याआधी गोपींविषयी जे वर्णन केले गेले आहे ती सिद्धावस्था आहे. ज्याप्रकारे हिमालयातून उगम पावून गंगा कुठल्याही विशेष प्रयत्नांशिवाय स्वाभाविकरीत्या समुद्राकडे अग्रेसर होते, त्याचप्रमाणे गोपींच्या हृदयांची गती (प्रवृत्ती) न थांबता श्रीकृष्णांच्या चरणांकडे प्रवाहित होते. हा 'सिद्धी'चा स्तर आहे, परंतु येथे आपण 'साधने'ची समीक्षा (चर्चा) करित आहोत. भक्तिरसामृतसिंधू आणि अन्य ग्रंथांचे हेच मत आहे की बिल्वमंगल ठाकूर एक साधक होते. जिन्याच्या केवळ पहिल्या पायरीवर उभे राहून आम्ही स्वतःप्रती वास्तविक साधक असण्याचा अभिमान बाळगू शकू काय?

श्रवण, कीर्तन, विष्णू–स्मरण, पादसेवन, दास्य, अर्चन, वंदन, सख्य, आत्मनिवेदन रूपी नवविधा भक्ती दोन प्रकारची असते. एक आहे—**'वैधी भक्ती'** आणि दुसरी आहे—**'रागानुगा भक्ती'**. भक्ती अशा प्रकारे दोन प्रकारची असते आणि आम्हाला दोहोंचे पालन

करावयास हवे. असे नाही की आम्हाला वैधी भक्ती सोडून द्यायची आहे, परंतु आमच्या आंतरिक भावना बदलून जातील. बाह्यतः आमचे स्वरूप तेच राहील परंतु हृदयात निष्ठा प्रबळ होईल. अशा प्रकारच्या निष्ठावान साधकांना 'वास्तविक साधक' म्हटले जाऊ शकते. ते साधना कशी करतात? ते अश्रूंनी डबडबलेल्या डोळयांद्वारे आपल्या हृदयाला एका फुलासारखे श्रीकृष्णांच्या चरणी समर्पित करतात. परंतु काही करण्याआधीच श्रीकृष्ण स्वतः येऊन ते पुष्प ग्रहण करतात. जसे बिल्वमंगल ठाकूरांच्या सोबत घडले. ते एक साधक होते आणि शेवटी काय झाले? भगवान श्रीकृष्ण स्वतः आले आणि त्यांचा हात पकडून त्यांना वृंदावन पर्यंत घेऊन गेले. ते अशा प्रकारे साधनेत रत (तल्लीन) होते की दिवसरात्र भगवंताच्या ध्यानातच निमग्न होते. ते सख्य–भावात आविष्ट होऊन श्रवण, कीर्तन, स्मरण व पादसेवन करित असत. आम्हालाही अशाच प्रकारे साधना करावयास हवी, ज्यात ज्ञान आणि कर्माचा लेशमात्रदेखील स्पर्श नसावा. तेंव्हा क्रमशः आमचे स्वतःचे चिद्स्वरूप (चिन्मय स्वरूप) उदित होऊन आम्ही श्रीकृष्णांची साक्षात सेवा करू शकू. एका 'रागानुगा' भक्ताला अशाच प्रकारे साधना करावयास हवी.

श्रील रघुनाथ दास गोस्वामी देखील एक उदाहरण आहेत. जरी आंतरिक रूपात ते सिद्ध होते, परंतु बाह्य रूपात त्यांनी एका साधकाचे आचरण केले.

**संख्यापूर्वक–नामगाननतिभिः कालवसानीकृतौ**
**निद्राहार–विहारकादि–विजितौ चात्यन्त–दीनौ च यौ।**
**राधाकृष्ण–गुणस्मृतेर्मधुरिमानन्देन सम्मोहितौ**
**वन्दे रूप–सनातनौ रघुयुगौ श्रीजीव–गोपालकौ॥**

*(श्रीषड्गोस्वामी अष्टक–६)*

दररोज नियमित रूपाने एक लाख हरिनाम संख्या पूर्ण झाल्यानंतरच ते पाणी ग्रहण करित असत. दररोज वैष्णवांना, धाम आणि भगवान श्रीकृष्णांच्या लीलास्थळांना एक हजार वेळा दंडवत प्रणाम करित असत. त्यांच्या स्वभावात मृदुता आणि दीनता होती आणि रात्रंदिवस ते कृष्णाच्या चिंतनात निमग्न असत.

लहानपणीच त्यांनी आपले पारिवारिक गुरू यदुनंदन आचार्य यांच्याकडून दीक्षा ग्रहण केली होती; तसेच श्रील हरिदास ठाकूर यांचा सत्संग प्राप्त केला होता. श्रील हरिदास ठाकूर यांच्या

सत्संगाच्या प्रभावामुळे त्यांनी हरिनाम करण्यास प्रारंभ केला. श्रील रघुनाथ दास गोस्वामी श्रीकृष्णांचे एक नित्यसिद्ध परिकर (पार्षद) आहेत, परंतु प्रत्यक्ष रूपात त्यांनी एका साधकासारखे आचरण करून आम्हा सर्वांना शिकवण प्रदान केली आहे.

कालांतराने श्रील रघुनाथ दास यांचा विवाह स्वर्गातील अप्सरेसमान सुंदर असलेल्या एका कन्येसोबत झाला. ते स्वतः एखाद्या राजकुमाराच्या समान होते आणि त्यांचे शरीर देखील अत्यंत सुंदर व सुकोमल होते. सोळा वर्षांच्या अल्प वयातच ते श्रीकृष्ण विरहात उन्मत्त होऊन गेले. अनेकदा त्यांनी घर सोडण्याचा प्रयत्न केला परंतु त्यांचे परिवारातील सदस्य त्यांना पुन्हा पकडून माघारी घेऊन येत. श्रीनित्यानंद प्रभूंची सेवा करून त्यांना श्रीनित्यानंद प्रभूंची कृपा प्राप्त झाली. त्या नंतर कसेतरी ते घरातून निघून जाण्यात यशस्वी ठरले. ते रात्री जंगलाच्या मार्गाने पळाले, जेणेकरून कुणी त्यांना पकडू नये. सातत्याने सात दिवस ते न खातापिता चालत राहिले. सातव्या दिवशी एका गवळयाने त्यांना थोडे दूध आणि कुरमुरे खायला दिले. इतक्या लहान वयात ते रात्रंदिवस चालत–चालत शेवटी जगन्नाथपुरीला येऊन पोहोचले.

आजच्या आधुनिक काळात आम्ही धाम–यात्रा करण्याआधी रेल्वेत (आगगाडीत) जागेचे आरक्षण करतो, तसेच हजार किंवा दोन हजार रुपये सोबत घेऊन जातो. परंतु धाम–यात्रेची ही पद्धत नव्हे. श्रील रघुनाथ दासांनी आपल्या रहाण्याची, खाण्याची, झोपण्याची चिंता न करता आपल्या घर परिवाराचा पूर्णतः परित्याग केला आणि श्रीकृष्णांना भेटण्याच्या उत्कंठेने ते सतत रडत राहात. पुरीला गेल्यानंतर श्रीचैतन्य महाप्रभूंनी त्यांना आलिंगन केले आणि म्हटले, "तुम्ही येथे येण्यासाठी विष्ठेच्या खड्ड्याचा (म्हणजे एका संसारी माणसाच्या गृहाचा) परित्याग केला आहे," महाप्रभूंनी पुन्हा त्यांना आलिंगन केले. जवळच स्वरूप दामोदर बसले होते, महाप्रभूंनी रघुनाथ दासांना त्यांच्या सुपूर्द केले आणि म्हणाले —"आजपासून स्वरूप दामोदरच तुमचे पिता, माता, भ्राता (भाऊ, बंधू), गुरू सर्व काही आहेत. आज मी तुम्हाला यांच्या हाती सुपूर्द करतो आहे. तुम्ही कुठल्याही गोष्टीची चिंता करू नका." अशा प्रकारे भगवंतांनी स्वतः श्रील रघुनाथ दासांना अशा उन्नत गुरूंच्या हाती सोपविले.

श्रील रघुनाथ दास जगन्नाथपुरीत अत्यंत वैराग्यपूर्वक राहू लागले. त्यांचे धनवान वडील त्यांच्या राहाण्याची आणि

खाण्यापिण्याची व्यवस्था करू इच्छित होते, परंतु त्यांनी ते स्वीकार केले नाही. ते श्रीजगन्नाथांच्या स्वयंपाकघरातून फेकण्यात आलेला सडलेला भात जो गाईदेखील खात नसत, तो उचलून घेऊन आणत. त्या भाताला पाण्याने धूत असत आणि त्यात थोडे मीठ मिसळून खात असत. त्यावरच ते आपला उदरनिर्वाह करीत असत. त्यांची एकमात्र संपत्ती एक मातीचे जलपात्र (पाणी पिण्यासाठी मातीचा एक गडवा किंवा गाडगे) होते; त्यांच्याकडे कुठली थाळी किंवा घोंगडीदेखील नव्हती. जगन्नाथपुरी समुद्राच्या तटावर स्थित आहे, म्हणून तेथे जास्त गरमी किंवा थंडी पडत नाही, म्हणून कसेतरी ते आपल्या झोपण्याची व्यवस्था करून घेत असत. लोकांनी टाकून दिलेल्या वस्त्रांपासून दोन कौपीन (लज्जा-रक्षणासाठी बांधलेले कमरेचे वस्त्र किंवा लंगोटी) बनवून त्या धारण करून भजन करीत असत. परंतु आम्ही स्वतःकडे पाहावे की आम्ही कसे रहातो आहे आणि काय घालतो ते?

आपल्या अठ्ठेचाळीसाव्या वर्षी महाप्रभूंनी हे जग सोडून आपली लीला संगोपन (पूर्णतः अदृश्य) केली. त्यांच्या विरहात श्रील रघुनाथ दासांनी खाणेपिणे सोडले. ते रात्रंदिवस रडत असत. यालाच 'साधन' म्हणतात. आणि जे असे जीवन व्यतीत करतात, ते 'साधक' आहेत. त्यानंतर श्री चैतन्य महाप्रभूंच्या विरहात श्रीस्वरूप दामोदरांनीसुद्धा आपला देह सोडून गोलोक व्रजधामात प्रवेश केला. त्यानंतर तर श्रील रघुनाथ दासांनी पाणी पिणे देखील त्यागले आणि ते रात्रंदिवस केवळ रुदन (विलाप, क्रंदन) करीत बसत. ते नंतर जगन्नाथपुरीत राहू शकले नाहीत कारण त्यांची दशा अशी झाली होती, जशी श्रीकृष्ण मथुरेला गेल्यानंतर नंदबाबांची झाली होती. आपल्या घरातील प्रत्येक वस्तू (श्रीकृष्णांचे पीतांबर, श्रीकृष्णांची बासरी, श्रीकृष्णांचे मोरपीस) श्रीनंदबाबांना श्रीकृष्णांचीच आठवण करून देत असे. असा तीव्र विरह अनुभविल्यावर ते घरातून बाहेर निघून जात असत. यमुनेच्या काठी गेल्यानंतर तेथे श्रीकृष्णांचे पदचिन्ह (पाउलखूण, पावलांचा ठसा) पाहून पुन्हा ते विरहाने व्याकूळ होऊन जात. ते त्या वृक्षाला पाहात ज्यावर चढून श्रीकृष्ण कालिय नागाचे दमन करण्यासाठी पाण्यात झेपावले होते. यामुळे श्रीनंदबाबांना आणखीच तीव्रतेने श्रीकृष्णांची आठवण होत असे; मग ते आपले नेत्र बंद करून घेत असत. मग ते श्रीगोवर्धन पर्वताकडे जात. तेथे त्यांना वाटे जणू सगळे वृक्ष विरहात एकमेकांवर झुकून रडत आहेत, (जणू विचारीत आहेत),

"श्रीकृष्ण कोठे निघून गेले?" राधाकुंड, श्यामकुंड, कुसुम सरोवर आणि मानसीगंगा श्रीनंदबाबांचा विरह–ताप अधिकच तीव्र करीत असत. शेवटी ते पुन्हा घरी परतून येत.

अशा प्रकारे श्रील रघुनाथ दास जगन्नाथपुरीमध्ये जे काही पहात, त्यामुळे त्यांना श्रीचैतन्य महाप्रभू आणि श्रीस्वरूप दामोदरांचे स्मरण होत असे. म्हणून जगन्नाथपुरीमध्ये रहाण्यास असमर्थ होऊन ते पायी चालत वृंदावनात पोहोचले. तेथे जाऊन त्यांनी स्वतःला श्रील रूप गोस्वामी आणि श्रील सनातन गोस्वामींच्या चरणी समर्पित केले. त्यांनी विचारले—"तुम्ही येथे का आला आहात?" दास गोस्वामी उत्तरले—"श्रीचैतन्य महाप्रभू आणि स्वरूप दामोदर या जगातून निघून गेले आहेत. म्हणून मीसुद्धा त्यांच्याशिवाय येथे राहू शकणार नाही. श्रीगोवर्धन पर्वतावरून उडी मारून अथवा मध्यरात्री श्रीराधाकुंडात बुडून देहत्याग करीन आणि श्रीमती राधाजींच्या चरणांची प्राप्त करीन, मी येथे यासाठी आलो आहे." 'दिव्य विरह' अशीच वस्तू असते.

श्रील रूप आणि श्रील सनातन यांनी श्रील रघुनाथ दासांना आत्महत्या करण्यापासून परावृत्त केले आणि त्यांना श्रीराधाकुंडाजवळ निवासस्थान दिले. येथे राहूनच ते आपल्या सेवा करीत असत. कालांतराने श्रीचैतन्य महाप्रभूंच्या विरहात श्रील रूप–सनातन देखील हे जग सोडून गेले. श्रील रघुनाथ दास गोस्वामींनी विचार केला —"आता मी कोणाचा आश्रय घेऊ?" श्रील रूप–सनातनांच्या विरहात श्रीगिरिराज गोवर्धन त्यांना एखाद्या अजगरासमान भासे, जणू काही त्यांना गिळून टाकेल. श्रीराधाकुंड एखाद्या वाघिणीच्या सारखे भासत असे. श्रीनंदग्राम, श्रीबरसाना आणि अन्य लीलास्थळे शून्यासमान म्हणजे रिक्त वाटत असत. श्रील रूप गोस्वामींच्या विरहात त्यांनी पाणी पिणेसुद्धा सोडून दिले, आपले जीवन धारण करण्यासाठी कधीकधी ताकाचे काही थेंब ते ग्रहण करीत असत. श्रीराधाकुंडाच्या किनारी विरहाने कातर होऊन रडत आणि म्हणत असत—

**हे राधे! व्रजदेविके! च ललिते! हे नन्दसूनो! कुतः**
**श्रीगोवर्धन–कल्पपादप–तले कालिन्दिवन्ये कुतः।**
**घोषन्ताविति सर्वतो व्रजपुरे खैदेर्महाविव्हलौ।**
**वन्दे रूप–सनातनौ रघुयुगौ श्री जीव–गोपालकौ॥**

*(श्रीषड्गोस्वामी अष्टक—८)*

"हे व्रजच्या पूजनीय देवी! राधिके! आपण कुठे आहात? हे

ललिते! आपण कुठे आहात? हे व्रजराजकुमार! आपण कुठे आहात? श्रीगोवर्धनाच्या कल्पवृक्षांखाली बसलेले आहात की कालिंदीच्या (यमुना नदीच्या) कमनीय तटावर विराजमान वन–समूहांमध्ये भ्रमण करीत आहात?"

अशाप्रकारे पुकारत–पुकारत श्रील रघुनाथ दास गोस्वामी विरहात भावाकुल होऊन व्रजच्या चारी दिशांना विचरण करीत असत. ते अशा प्रकारे भजन करीत असत. त्यावेळी ते आपल्या हृदयाच्या भावरूपी फुलांची माळ बनवून श्रीमती राधिकेच्या पदनखज्योतीस (पायाच्या नखांच्या ज्योतीस किंवा तेजास) अर्पण करीत असत आणि म्हणत—'राधे, राधे, राधे!' श्रीराधाकृष्णांना प्राप्त करण्याचे हेच साधन आहे.

कर्मयोगाच्या साधनेद्वारे सहजच स्वर्गाची प्राप्ती केली जाऊ शकते. तपस्येच्या द्वारे श्रीध्रुव महाराजांनी सशरीर (शरीरासोबतच) वैकुंठास गमन केले होते. परंतु ज्या कृष्ण–भक्तीचे आम्ही वर्णन करीत आहोत ती अत्यंत दुर्लभ आणि सहजसुलभ प्राप्त होणारी नाही. श्रील रघुनाथ दास गोस्वामींनी आपल्या हृदयातील विरह विलासरूपी कुसुमांच्या अंजलीस (ओंजळीभर फुलांना) श्रीराधाजींच्या चरणी भेट केले आहे, ज्यास 'विलाप–कुसुमांजली' या नावाने जाणले जाते. ते आपल्या सिद्ध स्वरूपात श्रीराधिकेच्या चरण सेवेची प्रार्थना करताना म्हणतात—"हे राधे! तुमच्या गृहाचे संमार्जन (घर साफ) करण्याच्या सेवेची सुसंधी मी कधी प्राप्त करू शकेन? गोपी रूपात मी आपल्या केसांनी कधी आपल्या घरातील प्रणालिका (नाली) साफ करीन. आपल्या चरणांना अइता (अळइता) लावण्याचे सौभाग्य मला कधी प्राप्त होईल." त्यांच्या अशा प्रार्थना होत्या. असे भक्तच वास्तविक 'साधक' आहेत.

श्रवणं, कीर्त्तनं, विष्णु–स्मरणं—येथे आमच्यासाठी 'विष्णु–स्मरणा'चा काय अर्थ आहे? राधाजींचे स्मरण, श्रीराधाकृष्णांच्या लीलांचे स्मरण. श्रील रघुनाथ दास गोस्वामी लिहितात, "श्रीश्रीराधाकृष्णांच्या लीलाच माझ्या एकमात्र भूषण आहेत. मी त्यांच्या व्यतिरिक्त आणखी काहीच ऐकू इच्छित नाही. मला वैकुंठात जाण्याची देखील अभिलाषा नाही आहे. आपल्या जीवनाच्या निर्वाहासाठी भाकरीचा एक तुकडा ग्रहण करीत मी सदैव, श्रीवृंदावन, श्रीराधाकुंड येथे वास करीन. माझे शरीरच हे स्थान सोडेल, पण माझे प्राण नाहीत!" त्यांची धाम निष्ठा अशी होती.

भगवंताच्या सेवेच्या प्राप्तीची 'तीव्र उत्कंठा' साधनेसाठी अत्यंत आवश्यक असते. ज्यांच्यात अशी उत्कंठा आहे असे भक्त वास्तविक साधक आहेत. परंतु आम्ही कुठे आहोत, काय आहोत? आम्ही भक्तीरूपी जिन्याच्या पहिल्या पायरीवरच श्रवण आणि कीर्तन करत आहोत. निष्ठेनुसार भक्ती दोन प्रकारची असते, **(१) निष्ठिता भक्ती आणि (२) अनिष्ठिता भक्ती.** सध्या आमचे साधन अनिष्ठिता भक्तीच्या अंतर्गत मोडते. कारण अजून आमच्या बुद्धीत स्थिरता आलेली नाही. काहीजण असा विचार करतात,—"मी घरातच राहून भजन करीन आणि आपल्या वृद्ध मात्या-पित्यांची देखभाल देखील करीन." कुणी विचार करते—"मी असे ऐकले आहे की गृहस्थ जीवन एका नरकरूपी विहिरीप्रमाणे असते म्हणून मी हे सोडून एका आश्रमात जाऊन राहीन. परंतु अर्जुन, श्रीवास पंडित आणि गोपी—हे सगळेच उच्च भक्त होते आणि ते गृहस्थ होते म्हणून मलासुद्धा गृहस्थच रहावयास हवे. परंतु श्रीनारद मुनी, श्रीशुकदेव गोस्वामी, वृंदावनचा गोस्वामी-वर्ग आणि श्रीचैतन्य महाप्रभू या सगळयांनी गृहस्थ जीवनाला अंधकूप (ओसाड रानातील सुक्या गवताने झाकलेली कोरडी विहीर) समजून सोडून दिले. ते घरात भजन करू शकले नाही. मग मी काय करू? ठीक आहे, मी काही दिवस येथे (घरीच) राहीन आणि सोडून जाईन. नको, नको, मला लगेचच निघून जायला हवे." अशा प्रकारे अनिश्चित अवस्थेतली दुविधा (मनाची चलबिचल, द्विधा मनःस्थिती) आम्ही सतत अनुभवत असतो. आमची भक्ती अनिष्ठिता आहे. आम्हाला आमच्या बुद्धीस निश्चल करून निष्ठेच्या स्थितीपर्यंत यायला हवे, पोहोचायला हवे.

निष्कपट रूपाने हरिनाम करता-करता, तसेच हरिकथा श्रवण करता करता साधकास प्रतिष्ठा प्राप्त होऊ लागते, आणि मुक्ती हात जोडून मागे उभी राहून विनंती करते की—"हे प्रभो! काय मी आपली कुठल्याप्रकारे सेवा करू शकते का?" आठ प्रकारच्या योगसिद्धी (अणिमा, लघिमा, महिमा, गरिमा, ईशित्व, वशित्व, प्राप्ती आणि प्राकाम्य) आपापल्या सेवा प्रदान करण्यास प्रस्तुत असतात.

**भक्तिस्त्वयि स्थिरतरा भगवन् यदि स्याद्**
**दैवेन नः फलति दिव्यकिशोरमूर्तिः।**
**मुक्तिः स्वयं मुकुलिताञ्जलि सेवतेऽस्मान**
**धर्मार्थ कामगतयः समय प्रतीक्षा॥**

*(कृष्ण-कर्णामृत—१०७)*

—"हे भगवंता! जर आपल्या श्रीचरणकमळांमध्ये दृढ भक्ती झाली तर आपल्या परम मनोहर दिव्य–किशोर मूर्तीचे दर्शनरूपी फळ सहजच प्राप्त होऊन जाते. त्यानंतर 'मुक्ती' तर हात जोडून समोर उभी राहते. सोबतच 'धर्म', 'अर्थ', आणि 'काम'देखील भक्तिपूर्ण हृदय असणाऱ्याच्या सेवेच्या संधीची प्रतीक्षा करत राहतात."

निष्ठा प्राप्त केल्यानंतरच आम्ही आमचे मन श्रीकृष्णांत लावू शकतो; परंतु काही–काही अनर्थ तरीसुद्धा राहून जातात. आमची पूर्व–पूर्व कर्मे मग ती पापे असोत किंवा पुण्य, त्यांच्या प्रतिक्रिया तर होतच असतात. आम्ही कर्ममिश्रा भक्तीसुद्धा करू शकतो, ज्यांच्यात अनेक कामनांच्या पूर्तीची इच्छा असते, त्याचे फळदेखील प्राप्त होते. (कर्ममिश्रा भक्ती केल्यास) या जगातील व्यक्ती ज्या अलभ्य वस्तूंच्या कामनांची पूर्ती करता कठीण प्रयत्न करित असतात, त्या वस्तू आम्हाला सहज–सुलभपणे उपलब्ध होऊन जातील. प्रचुर प्रतिष्ठा प्राप्त होईल आणि आम्ही त्या सुखात सुगमतेने (सुलभतेने) निमग्न होऊन जाऊ. म्हणून यापासून सावधान रहा.

**अनर्थ चार प्रकारचे आहेत—(१) दुष्कृति–उत्थ, (२) सुकृति–उत्थ, (३) अपराध–उत्थ आणि (४) भक्ति–उत्थ.**

**(१) दुष्कृति–उत्थ—**अविद्या, अस्मिता, राग, द्वेष आणि दुरभिनिवेश —या क्लेशांचे नाव दुष्कृतोत्थ अनर्थ आहे. श्रीकृष्णांना विसरणेच अविद्या आहे. निर्जीव शरीरात 'मी' आणि 'माझे' हा अभिमान अस्मिता आहे. विषयांमध्ये आसक्तीचे नाव राग आहे. प्रतिकूल विषयांमध्ये द्वेष असतो. पापकार्यांमध्ये आसक्ती दुरभिनिवेश आहे.

**(२) सुकृति–उत्थ—**पूर्व–जन्मात अर्जित केलेल्या नाना–प्रकारच्या सुख–भोगांना सुकृतोत्थ अनर्थ म्हणतात.

**(३) अपराध–उत्थ—**नामापराध वगैरे फलस्वरूप प्राप्त होणाऱ्या दुःखभोगांना अपराधोत्थ अनर्थ म्हणतात.

**(४) भक्ति–उत्थ—**सकाम अथवा सोपाधिक भक्तीपासून उत्पन्न लाभ, पूजा, प्रतिष्ठा इत्यादींना भक्त्युत्थ अनर्थ म्हणतात म्हणतात.

या सर्व अनर्थांना दूर करण्याची कृती करायला हवी अन्यथा निष्ठा उत्पन्न होत नाही. अथवा जर आपण कुणा वैष्णवाच्या चरणी अपराध करून बसलो तर त्याची देखील प्रतिक्रिया अवश्य होणारच.

या चारही प्रकारच्या अनर्थांना दूर सारीत आम्हाला आमच्या साधनेत अग्रेसर व्हायला हवे. क्रमशः आमची निष्ठा रुची आणि

आसक्तीत परिवर्तीत होऊन जाईल. आसक्तीच्या दशेत आम्हास आमच्या भजनात पूर्ण आसक्ती निर्माण होईल.

**गुरौ गोष्ठे गोष्ठालयिषु सुजने भूसुरगणे**
**स्वमन्त्रे श्रीनाम्नि व्रजनवयुवद्वन्द्वशरणे।**
**सदा दम्भं हित्वा कुरु रतिमपूर्वमतितरा-**
**मये स्वान्तर्भ्रातश्चटुभिरयाचे धृतपदः॥**

*(मनःशिक्षा-१)*

"हे माझ्या अबोध अंतःकरणा! माझ्या प्रिय भाऊ मना! मी तुमच्या चरणांना पकडून नम्रतापूर्वक प्रिय शब्दांद्वारे ही प्रार्थना करतो की तुम्ही सर्वतोभावेन दंभाचा (दिखाऊपणे वागण्याचा) परित्याग करून आपल्या श्रीगुरुदेवांच्या, श्रीव्रजधामाच्या, श्रीव्रजवासीजनांच्या, श्रीवैष्णवजनांच्या, भुसुरांच्या (ब्राह्मणांच्या), श्रीभगवन्नामाच्या आणि व्रजच्या नित्य नवीन किशोर-किशोरी श्रीश्रीराधा-कृष्ण युगुलाच्या शरणी शीघ्रच नैरन्तर्यमयी लोकोत्तर रती प्राप्त करा."

आम्हास भजन आणि भजनीय दोघांमध्येही निष्ठा आणि आसक्ती असावयास हवी. श्रवणं-कीर्त्तनं इत्यादी 'भजन' आहे आणि श्रीराधाकृष्ण आमचे 'भजनीय' आहेत. जेंव्हा आपली रुची 'भजन' आणि 'भजनीय' या दोहोंसाठी परिपक्व होते तेव्हा आसक्तीची स्थिती उत्पन्न होते. त्यानंतर भगवंताच्या दयेने हृदय स्थिर होते. या अवस्था मद्-भक्ताच्या अंतर्गत आहेत.

श्रीभगवान कशा प्रकारे आपल्या भक्तांचे योगक्षेम वहन करतात याबद्दलची एक सत्य घटना पुढे दिली जात आहे—

अर्जुन मिश्र नामक एक दरिद्री (निर्धन) ब्राह्मण होते, परंतु ते परम भगवद्भक्त होते. त्यांनी अनेक शास्त्रांचा तसेच भगवद्गीता आणि श्रीमद्-भागवताच्या व्याख्यांचा अभ्यास केला होता. ते दररोज भगवद्गीता वाचत असत. ती वाचताना त्यांच्या हृदयात अनेक आध्यात्मिक भावना प्रकट होत. ते आपल्या अनुभूती लिहून ठेवायचे. त्यांनी आपल्या अनुभूती पुस्तक रूपात प्रकाशित करण्याची इच्छा होती जेणेकरून सामान्य लोक सहजरीत्या त्या अनुभूती समजू शकतील. त्यांनी श्रीमद्भवद्गीतेची व्याख्या लिहायला घेतली होती. ते दररोज प्रातःकाळी भजन-कार्य उरकून एक प्रहर दिवस चढेपर्यंत श्रीगीतेची व्याख्या लिहित असत. त्यानंतर ते भिक्षेसाठी बाहेर जात असत. भिक्षेमध्ये जे काही प्राप्त होत असे ते पत्नीसमोर आणून ठेवीत असत.

त्या ब्राह्मणी मोठ्या प्रेमाने स्वयंपाक करीत असत; भगवंतांना नैवेद्य अर्पण करून स्वामींना (आपल्या पतिदेवांना) महाप्रसाद भोजन करवित असत आणि जे काही उरत असे ते संतुष्ट चित्ताने स्वतः ग्रहण करीत असत. त्यांची सगळीच वस्त्रे जुने-जीर्ण आणि फाटके होते. केवळ एक धोतरच थोड्या चांगल्या अवस्थेत होते जे बाहेर घालण्यास उपयुक्त होते. जेव्हा ब्राह्मण ते घालून भिक्षेसाठी बाहेर जात असत, त्यावेळी ब्राह्मणी चिंध्यांनी आपले अंग झाकून लज्जा निवारण करीत असत. स्वामी जेव्हा भिक्षेहून परतत, तेव्हा ब्राह्मणी ते धोतर परिधान करून बाहेर येत असत आणि गृहकार्ये संपन्न करीत असत. तरीदेखील दारिद्र्याला भगवंताची देणगी समजून दोघेही सर्वदा संतुष्ट रहात असत. 'गृहदेवता श्रीगोपीनाथजी कृपा करून जी काही भिक्षा देतात, ती भिक्षा त्यांनाच अर्पण करून महाप्रसाद घ्यावा'—सर्वदा त्यांची अशीच भावना होती. अशाप्रकारे त्यांचे दिवस आनंदात चालले होते. सांसारिक दुःख-कष्टांनी ते जरादेखील विचलित होत नसत.

अशाप्रकारे नित्यनेमाने गीतेची टीका लिहिली जात होती. एक दिवस ब्राह्मण भजनातून निवृत्त होऊन टीका लिहिण्यास बसले. **"अनन्याश्चिन्तयन्तो मां ये जनाः पर्युपासते। तेषां नित्याभियुक्तानां योगक्षेमं वहाम्यहम्॥"** (गीता ९/२२) या श्लोकाची टीका लिहावयाची होती. श्लोक वाचतांना एक जटिल समस्या उत्पन्न झाली. ते कुठल्याही प्रकारे त्याचे समाधान करू शकले नाहीत. जे स्वयं-भगवान आहेत, जे संपूर्ण विश्व-ब्रह्मांडाचे एकमात्र अधीश्वर आहेत, ते स्वतः आपले अनन्य भावाने भजन करणाऱ्या व्यक्तींचे योगक्षेम स्वतः कसे काय वहन करतील? नाही, हे कदापि संभव नाही. जर हे सत्य असेल तर माझी ही अशी अवस्था का बरे आहे? मी तर अनन्य भावनेने केवळ त्यांचाच भरवसा करतो, मी माझे यथासर्वस्व त्यांच्याच चरणी अर्पण केले आहे तरीसुद्धा मला असे दुःख-दारिद्र्य का भोगावे लागत आहे? तेव्हा 'नित्याभियुक्तांना योगक्षेमं वहाम्यहम्' भगवंताच्या मुखारविंदातून निघालेले वाक्य नाही, तर प्रक्षिप्त (नंतर कुणीतरी जोडलेले) असावे. ते आपल्या बुद्धीने हा गुंता सोडवण्याचा जितका प्रयत्न करीत तितके अधिक त्यांत गुंतून जात. हळूहळू त्यांचा संदेह (शंका) वाढू लागला. शेवटी त्यांनी त्या ओळींवर लाल शाईने तीन रेघांनी काट मारून ग्रंथ लिहीणे थांबविले आणि ते भिक्षेसाठी निघाले.

येथे करुणामय प्रणतपाल (ते जे दीनांचे किंवा भक्तांचे पालन

करतात) भगवंतांनी पाहिले की माझ्या भक्ताच्या मनात माझ्या वचनांप्रती संदेह उत्पन्न झाला आहे. तेव्हा त्यांनी अतिशय मनोहर सुकुमार श्याम वर्णाच्या बालकाचा वेष धारण केला. दोन टोपल्यांमध्ये प्रचुर तांदूळ, डाळ, भाज्या, तूप इत्यादी सामान भरून ते स्वतःच्या खांद्यावर वहन करीत मिश्रजींच्या द्वारी पोहोचले. दरवाजा आतून बंद होता. आधी त्यांनी दरवाजा जोरजोरात ठोठावला आणि मग जोरजोरात हाक घालू लागले—"आई! आई!" बिचाऱ्या ब्राह्मणींकडे परिधान करायला वस्त्रच नव्हते. चिंधड्या लपेटून कुणासमोर जाणार तरी कसे? लज्जावशतः त्या चुपचाप बसून राहिल्या. परंतु, दरवाज्याच्या खटखटविण्याचा आणि बोलाविण्याचा आवाज क्रमशः वाढतच गेला. शेवटी लाचार होत त्यांनी दरवाजा उघडला. बालक ओझे घेऊन आत आले आणि ते अंगणात उतरवून बाजूला जाऊन उभे राहिले. ब्राह्मणी लाजेने मुख खाली करित घरात निघून गेल्या. बालकाचा वेष धारण केलेले भगवंत ब्राह्मणींना म्हणाले—"आई! पंडितजींनी (मिश्रजींनी) मला हा शिधा (भोजनाची कच्ची सामग्री) घेऊन पाठविले आहे. आपण हे सर्व घेऊन जा."

ब्राह्मणी आत्तापर्यंत घरात लाजेने मान खाली घालून उभ्या होत्या. बालकाचे मधुर शब्द ऐकून त्यांनी अंगणात पाहिले तर मोठमोठ्या दोन टोपल्या भरून खाद्य–द्रव्ये भरली होती. इतकी भोजन–सामग्री त्यांनी आपल्या जीवन–काळात कधीच पाहिली नव्हती. मुलाने वारंवार सांगितल्यानंतर त्या वस्तू एकएक करून घरात नेवून ठेवू लागल्या. आनंद आणि उत्साहाने त्या सर्व वस्तू घेऊ जाताना वारंवार बालकाच्या मुखारविंदाला (कमळासारख्या सुंदर चेहऱ्याला) न्याहाळत होत्या.

बालकाचे सुंदर मुखमंडल पाहून त्या पूर्णकाम (सफल–मनोरथ) झाल्या—अहाहा! किती सुंदर मुख आहे! श्याम वर्णात इतके अलौकिक सौंदर्य असू शकते—याची जीवनात कधी कल्पनाच केली नव्हती! त्या मंतरल्यागत बघतच राहिल्या. बघताबघता त्यांची दृष्टी बालकाच्या वक्षस्थळावर (छातीवर) पडली. त्यांनी पाहिले की त्याच्या छातीवर तीन लांब–लांब व्रण आहेत; जणू काही नुकतेच कुणीतरी धारदार शस्त्राने ते चिरले असावे आणि रक्त निघत असावे. त्या आतूर होऊन म्हणाली, "बाळा! तुझी छाती अशी निर्ममपणे (निर्दयतेने, क्रूरतेने) कुणी चिरली? हाय हाय! इतक्या सुकोमल अंगांवर आघात करतांना तर पाषाण–हृदय देखील द्रवित

होईल (पाघळून जाईल).” बालक वेष धारण केलेले श्रीकृष्ण म्हणाले —“आई! मला शिधा आणण्यास थोडा उशीर लागला, म्हणून मिश्रजींनी स्वतः माझ्या छातीला चिरले.”

“हाय हाय! त्यांनी तुझी छाती चिरली?” ब्राह्मणींचे डोळे भरून आले—“ठीक आहे, घरी तर येऊ दे त्यांना, मग विचारते की तुझ्या सुकोमल अंगावर त्यांनी किती निष्ठूर होऊन हात उचलला आहे ते? बाळा! दुःख करू नकोस. थोडा वेळ थांब, मी आत्ता स्वयंपाक करते. तू ठाकुरजींचा प्रसाद घेऊनच जा.”

ब्राह्मणींनी बालकाला अंगणात बसविले आणि त्या स्वयंपाक घरात जाऊन आपल्या कामात व्यस्त झाल्या. इकडे भगवंतांनी विचार केला, “ज्या उद्देशासाठी मी या सर्व वस्तू येथपर्यंत वाहून आणल्या, ते कार्य पूर्ण झाले. ब्राह्मण आता घरी आल्यावर हातोहात माझ्या शब्दांच्या सत्यतेचे प्रमाण प्राप्त करतीलच. त्यांना पुन्हा कधी माझ्या शब्दांवर अविश्वास किंवा संदेह (शंका) होणार नाही.” अशा प्रकारे भक्ताचा संदेह दूर (शंकानिरसन) करण्याची व्यवस्था करून ते तत्क्षणी अंतर्धान पावले.

इकडे ब्राह्मणांना आज खूप प्रयत्न करूनही काहीच भिक्षा मिळाली नाही. ते निराश होऊन घरी परतले. विचार केला —“ठाकुरजींची अशीच इच्छा दिसते आहे.” दरवाजा ठोठावल्यावर ब्राह्मणींनी दरवाजा उघडला. घरात प्रवेश करताच पत्नीला स्वयंपाक करतांना पाहून ते म्हणाले—“स्वयंपाकाची तयारी तर करते आहेस पण आज काहीच भिक्षा मिळाली नाही. काय बनवणार आहेस?”

“का? थोड्यावेळापूर्वीच तर आपण त्या बालकाच्या हाती इतकी सगळी शिधासामुग्री पाठविली आहे, आम्ही दोघे ती सहा महिन्यात सुद्धा संपवू शकणार नाही. मग ‘स्वयंपाक काय करते आहेस’— असे का विचारता आहात?”—ब्राह्मणींना थोडे आश्चर्य वाटले. “परंतु आपले हृदय पाषाणासारखे इतके कठोर असेल असे मला कधीच वाटले नव्हते. या निष्पाप बालकाच्या सुकोमल अंगावर आपण कसे आघात केलेत? थोडीसुद्धा दया नाही आली? त्याची छाती चिरल्याने लाल–लाल असे तीन व्रण झाले आहेत, वाटते जणू लगेचच रक्त वाहू लागेल.”

मिश्रजींना आश्चर्याचा धक्काच बसला. त्यांनी विचारले—“शेवटी काय भानगड आहे? सरळसरळ सांग तरी! मी कुठलेच सामानही पाठविले नाही की कुण्या बालकाला मारलेलेही नाही. मला तर काही समजेनासे झाले आहे.”

ब्राह्मणींनी पतिदेवांचे बोलणे ऐकून त्यांना घरात ठेवलेले, तांदूळ, डाळ, पीठ, इत्यादी शिधासामुग्री दाखविली आणि अंगणात बसलेल्या बालकाच्या वक्षस्थळावर चिरलेल्या व्रणांच्या खुणा दाखविण्यासाठी यजमानांना बरोबर घेऊन त्या अंगणात आल्या. बघतात तर तेथे बालकच नव्हते. कुठे गेले? इकडेतिकडे शोधले, बाहेरचा दरवाजा तर पूर्ववत बंद होता. दोघेही आश्चर्यचकित होऊन एकमेकांकडे पाहू लागले. मिश्रजींना आता काहीच समजणे बाकी राहिले नाही. त्यांच्या डोळयांतून अविरत अश्रुधारा प्रवाहित होऊ लागल्या. तरीसुद्धा उरलासुरला संदेह दूर करण्यासाठी हात–पाय धुवून ठाकुरजींच्या घरात गेले आणि गीता–ग्रंथ उघडून पाहिला—आज सकाळी त्यांनी लाल शाईने ज्या तीन रेघांनी "नित्याभियुक्तानां योगक्षेमं वहाम्यहम्" या ओळीला काट मारली होती, आता त्या तिन्ही रेघा तेथे नव्हत्या. अतिशय आनंदाने त्यांना गहिवरून आले. ते देवघरातून बाहेर पडले आणि रडतरडत पत्नीला म्हणाले—"प्रिये! तू धन्य आहेस, आज तुला गोपीनाथजींचे साक्षात दर्शन घडले. हे सगळे सामान ते स्वतः घेऊन आले. मला इतकी शिधासामुग्री कोण देणार? आज सकाळी गीतेची व्याख्या लिहीताना मला भगवंतांच्या वाणीबद्दल संदेह निर्माण झाला होता. मी संदेहयुक्त अंशाला लाल शाईने तीन रेघांनी काट मारली होती. त्यामुळेच आपल्या गोपीनाथजींचे सुकोमल वक्षःस्थळ चिरले गेले. ते परम करुणामय आहेत. त्यांनी आपल्या वाणीची सत्यता प्रमाणित करून माझ्यासारख्या नास्तिकाचा संदेह दूर करण्यासाठी किती कष्ट घेतले आहेत."

ते पुढे बोलूच शकले नाहीत, गळा अवरुद्ध झाला (दाटला). ते प्रेमविभोर (प्रेमात निमग्न किंवा तल्लीन) होत 'हा गोपीनाथ! हा गोपीनाथ!!' म्हणत कोसळले. ब्राह्मणी गोपीनाथांसमोर शुद्ध हरविल्यागत स्तब्ध उभ्या राहिल्या. त्यांच्या डोळयांतून अश्रूंच्या धारा वाहू लागल्या. थोड्यावेळाने ब्राह्मणांना शुद्ध आली. त्यांनी स्नान इत्यादी नित्य क्रिया संपन्न करून गोपीनाथजींना भोग लावला. परम–प्रेमाने आणि आनंदाने त्या दोघांनी महाप्रसाद घेतला. मग ते नियमित रूपाने गीतेची व्याख्या लिहू लागले. त्यांचे जीवन अत्यंत प्रेममय होऊन गेले.

हीच भक्ती आहे आणि त्या साधनेचे उदाहरण आहे ज्याद्वारे भक्ती उदित होते. अर्जुन म्हणाले—"प्रभो! येथे या रणभूमीत असे करणे अत्यंत कठीण आहे. मी 'मन्मना भव' होऊ शकत नाही

आणि 'मद्भक्तो' सुद्धा करू शकत नाही. आपण कृपा करून मला तो उपाय सांगा जो साधा व सरळ असेल."

श्रीभगवान म्हणाले—'मद् याजि' माझी पूजा करा.



**हरे कृष्ण हरे कृष्ण कृष्ण कृष्ण हरे हरे।**
**हरे राम हरे राम राम राम हरे हरे॥**



# सातवा परिच्छेद

**सर्वगुह्यतमं भूयः श्रुणु मे परमं वचः।**
**इष्टोऽसि मे दृढमिति ततो वक्ष्यामि ते हितम्॥**
**मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु।**
**मामेवैष्यसि सत्यं ते प्रतिजाने प्रियोऽसि मे॥**

*(गीता १८/६४,६५)*

"सर्वांपेक्षा अत्यंत गोपनीय असे माझे परम वाक्य पुन्हा श्रवण करा. तुम्ही माझे अत्यंत प्रिय आहात, असे जाणून तुमच्या हितासाठीच सांगत आहे.

तुम्ही तुमचे चित्त मला समर्पण करा, माझ्या नाम–रूप–लीला इत्यादींचे श्रवण–कीर्तन परायण होऊन माझे भक्त बना आणि मला नमस्कार करा. अशाप्रकारे तुम्ही मलाच प्राप्त कराल. मी तुमच्याजवळ अशी सत्य प्रतिज्ञा करतो, कारण तुम्ही माझे प्रिय आहात."

येथे 'परमं' शब्दाचा काय अर्थ आहे? 'परमं' म्हणजे अत्यंत गोपनीय परम वाक्य, सर्व शास्त्रांचे सर्वोपरि सार आहे. या परम वाक्याला तेव्हाच जाणले जाऊ शकते, जेव्हा व्यक्ती काया (शरीर), मन आणि वाक्याद्वारे गुरू आणि भगवंतांना शरण जाईल, अन्यथा या सत्यास कृष्ण प्रकाशित करीत नाहीत. सद्गुरूंच्या निकट शरणागत होण्याचा विधी भगवद्गीतेत सांगितला आहे—

**तद्विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया।**
**उपदेक्ष्यन्ति ते ज्ञानं ज्ञानिनस्तत्त्वदर्शिनः॥**

*(गीता ४/३४)*

"ज्ञानाचा उपदेश देणाऱ्या गुरूंच्या निकट दंडवत प्रणामाद्वारे, संगत प्रश्नाद्वारे आणि सेवेद्वारे त्या ज्ञानास समजा. तत्त्वदर्शी ज्ञानिगण तुम्हाला त्या ज्ञानाचा उपदेश करतील."

ज्ञानाचा उपदेश देणाऱ्या गुरूंना दंडवत प्रणाम करून, संगत प्रश्नाद्वारे आणि सेवेद्वारे त्या ज्ञानाला समजावून घ्यावे. तत्त्वदर्शी ज्ञानिगण तुम्हाला त्या ज्ञानाचा उपदेश देतील. जे आपल्या गुरूंना निष्कपट रूपाने प्रणिपात, परिप्रश्न (चौकशी व विचारपूस) आणि सेवेद्वारे प्रसन्न करतात, तेच या ज्ञानाला समजण्याचा अधिकारी आहेत. जर कुणी गुरूंच्या निकट जाऊन आपल्या प्रश्नांची उत्तरे विचारतात, अथवा उत्तराला लक्ष देऊन ऐकत नाहीत, आणि मग पुन्हा विचारतात, तेव्हा गुरू त्यांना केवळ बाह्य उपदेश देतील, परंतु सर्वगुह्यतम उपदेश देणार नाहीत. याचाच विचार करून

श्रीकृष्णांनी प्रतिज्ञा केली की ज्यांचे हृदय तपस्येद्वारे शुद्ध झालेले नाही, जे शरणागत नाही आहेत आणि ज्यांनी गुरू आणि वैष्णवांची सेवा केलेली नाही, त्यांना गीतेचा उपदेश देऊ नये.

सर्वप्रथम भगवान श्रीकृष्णांनी श्रीअर्जुनांना निष्काम कर्माचा उपदेश दिला—

**यज्ञार्थात्कर्मणोऽन्यत्र लोकोऽयं कर्मबन्धनः।**
**तदर्थं कर्म कौन्तेय मुक्तसङ्गः समाचर॥**

*(गीता ३/९)*

हे कुंतीनंदन! श्रीविष्णूंसाठी अर्पित निष्काम कर्माव्यतिरिक्त अन्य कर्मांद्वारा मनुष्याला कर्मबंधन प्राप्त होते. म्हणून तुम्ही फळाची आकांक्षा सोडून भगवान विष्णूंच्या उद्देशाने कर्माचे उत्तम रितीने आचरण करा.

आत्तापर्यंत श्रीकृष्णांनी आपले चरम (परम) स्वरूप प्रकाशित केले नाही आहे. ते परमात्म्याकडेच प्रवृत्त होण्याचा सल्ला देत आहेत. मग गीतेच्या शेवटी ते 'मन्मना भव' श्लोकाची अवतारणा (उपोद्घात) करतात. जेव्हा ते म्हणतात, 'सर्वदा माझेच ध्यान करा', तेव्हा ते आपल्या श्यामसुंदर स्वरूपाकडे इंगित करतात. ज्यांचे काळे कुरळे केस खूप सुंदर आहेत, तसेच ज्यांनी आपल्या मस्तकावर मोराचे पीस धारण केले आहे, जे वृंदावनात कदंब वृक्षाखाली बनलेल्या कुंजात आपल्या त्रिभंग–ललित मुद्रेत उभे आहेत. त्यांच्या सुंदर ओठांवर बासरी विराजमान आहे. बासरीच्या छिद्रांतून श्रीकृष्ण आपल्या हृदयातील अमृताचा वर्षाव करीत आहेत. आम्हाला श्रीकृष्णांच्या याच रुपाचे ध्यान करावयास हवे. हा श्लोक सांगायच्या आधी श्रीकृष्णांनी आपल्या या रूपास गीतेत प्रकाशित केलेले नव्हते. 'मन्मना भव'ची व्याख्या आम्ही गोपींच्या उदाहरणाद्वारे केली आहे.

'मद्भक्तो'च्या संबंधात श्रवण, कीर्तन आणि स्मरणाविषयी सांगितले आणि हे पाहिले की उच्चकोटीच्या काही भक्तांनी गोस्वामी शास्त्रांच्या अनुशीलनाद्वारे आपले साधन करीत भगवंतांना प्राप्त केले.

भाव–दशेत 'मन्मना भव' आंशिक रूपाने (थोड्या किंवा अल्प प्रमाणात) संभव आहे, केवळ प्रेम–दशेतच कृष्णाचे निरंतर स्मरण होते. भक्त बनण्याच्या प्रक्रियेत (मद्भक्तो) सर्वप्रथम 'श्रद्धे'पासून आरंभ होऊन क्रमशः 'निष्ठा', 'रुची', 'आसक्ती' आणि अंतिमतः (शेवटी) 'भाव (रती)' उदय होतो. या स्थितीतच साधक 'भक्त'

बनतो आणि श्रीकृष्णांच्या विषयी चिंतन करतो.

यानंतर कृष्ण म्हणतात **'मद्याजि'**—'याजि' शब्दाचा अर्थ आहे यज्ञ. जर कुणाला भगवंताशी प्रेम झाले नाही, केवळ अल्प श्रद्धा मात्र आहे तर त्यास 'यज्ञ' करावयास हवा. कारण 'यज्ञ' सांसारिक बंधनाची चिकित्सा (वैद्यकीय उपचार) आहे. या विषयीचा संबंधित श्लोक श्रीचैतन्य महाप्रभू आणि श्रीराय-रामानंद यांच्यात झालेल्या संवादात सापडतो.

**नानोपचार-कृतपूजनमार्त्तबन्धोः**
**प्रेम्णैव भक्तहृदयं सुखविद्रुतं स्यात्।**
**यावत् क्षुदस्ति जठरे जरठा पिपासा**
**तावत् सुखाय भवतो ननु भक्ष्य-पेये॥**

*(चैतन्य चरितामृत मध्यलीला ८.६९*
*आणि पद्यावली १३)*

"जसे पोटात जोपर्यंत तीव्र भूक-तहान राहाते, तोपर्यंत भोजन आणि पिण्याचे द्रव्य सुखदायक असतात, त्याच प्रकारे आर्तबंधू (आर्त जनांचे बंधू) भगवंतांची नाना प्रकारच्या उपचारांनी पूजा झाल्यावर सुद्धा ती पूजा प्रेमयुक्त झाल्यावरच भक्तांचे हृदय आनंदाने द्रवित होते तात्पर्य हे आहे की तीव्र तहानभूक नसल्यास सुस्वादू (अतिशय स्वादिष्ट), सुगंधी आणि मधुर खाद्य व पानीय (पिण्याजोगे, पेय) द्रव्य देखील ग्रहण करण्याची इच्छा होत नाही. त्याच प्रकारे प्रेम न राहिल्याने नाना प्रकारच्या उपचारांसोबत पूजा केल्यावर देखील श्रीकृष्ण प्रसन्न होत नाही. परंतु तीव्र तहानभूक असल्यावर साधारण अन्न-जल देखील अत्यंत सुखकर आणि तृप्तिदायक असते. त्याच प्रकारे भक्ताच्या हृदयात जर प्रेम असते, तेव्हाच त्याच्या द्वारा प्रदत्त साधारण वस्तूने देखील श्रीकृष्ण अत्यंत आनंद (सुख) प्राप्त करतात."

श्रीविग्रहांची पूजा षोडशोपचारांद्वारे(सोळा उपचारांद्वारे) किंवा द्वादशोपचारांद्वारे (बारा उपचारांद्वारे) करता येते, परंतु जर पूजेत प्रेम नसले तर भगवान संतुष्ट होत नाहीत. जेव्हा तहान आणि भूक लागते तेव्हाच भोजन आणि पाणी स्वादिष्ट लागतात. भूक नसेल तर कुणी स्वादिष्ट भोजन प्रस्तुत केले, तरी ते रुचकर लागत नाही. त्याच्यात मीठ कमी किंवा जास्ती आहे, खीर पातळ झाली आहे, चपाती गोल नाही आहे आणि रसगुल्ला चपटा आहे—असे वाटेल. अनेक दोष दृष्टिगोचर होतील. परंतु जर भूक असेल तर

शिळी भाकरी सुद्धा पाणी आणि मिठासोबत चविष्ट लागेल. अशाप्रकारे जर साधकाच्या हृदयात प्रेम नसेल तर भगवंतांनाही भूक लागत नाही आणि ते त्या व्यक्तीच्या अर्चनेने (पूजा आणि स्तुतीने) प्रसन्न होत नाहीत. भक्ताच्या प्रेमाखातर भूक लागल्यावर भगवंत हा विचार करीत नाहीत की माझी पूजा षोडशोपचारांद्वारे (सोळा उपचारांद्वारे) होते आहे किंवा केवळ एकाच (उपचाराद्वारे). भक्ताच्या हृदयातील प्रेमच भगवंतात भूक उत्पन्न करते आणि ते म्हणतात—

**पत्रं पुष्पं फलं तोयं यो मे भक्त्या प्रयच्छति।**
**तदहं भक्त्युपहृतमश्नामि प्रयतात्मनः॥**

*(गीता ९.२६)*

"जे भक्तिपूर्वक मला पत्र (पाने), पुष्प (फुले), फळे, पाणी इत्यादी प्रदान करतात, मी त्या शुद्धचित्त भक्तांद्वारे भक्तिपूर्वक प्रदत्त त्या समस्त वस्तूंचे ग्रहण करतो."

येथे एक गोष्ट समजून घेणे आवश्यक आहे, आम्हाला असा विचार करता कामा नये की हे निवेदन भगवंताच्या प्रसन्नतेकरिता का आहे? अंतिमतः (शेवटी) तर हे सगळे आपल्याकरिताच, आपल्या सुखाकरिताच आहे.

श्रीमद्भागवतात म्हटले आहे—

**स वै पुंसां परो धर्मो यतो भक्तिरधोक्षजे।**
**अहैतुक्यप्रतिहता ययाऽऽत्मा सम्प्रसीदति॥**

*(श्रीमद्भागवत १.२.६)*

"इंद्रिय ज्ञानाच्याही पलीकडे मनुष्याकरिता सर्वश्रेष्ठ धर्म तोच आहे, ज्यायोगे श्रीकृष्णाची भक्ती होते. भक्तीही अशी, ज्यात कुठल्याही प्रकारची वासना नसावी आणि जी नित्य–निरंतर टिकून रहावी. अशा भक्तीमुळे हृदय आनंदस्वरूप भगवंताची उपलब्धी (प्राप्ती) करून, कृतकृत्य होऊन जाते. अशा भक्तीच्या बलाने अनर्थ दूर होतात आणि आत्मा प्रसन्न होतो."

या श्लोकाचे अंतिम चरण **'ययात्मा सम्प्रसीदति'**चा अर्थ हा लावता कामा नये की ते आमच्या सुख आणि संतोषास इंगित करीत आहे. त्या वेळेस ते आपल्या उपभोगाची इच्छा किंवा 'काम' बनून जाते. येथे आत्म्याचे तात्पर्य स्वतःशी नाही तर अधोक्षज भगवंताची भक्ती करण्याशी आहे. भगवान श्रीकृष्णांची प्रसन्नताच प्रधान आहे. जर ते संतुष्ट झाले तर आमची पूजा सार्थक आहे. जर कुठले कर्म आमच्या प्रसन्नतेकरिता केले जात

असेल, तर समजायला हवे की हे आपल्या कामना–वासना पूर्तीकरिता केले जात आहे. जर भगवंत प्रसन्न झाले तर जिवाला आपोआपच प्रसन्नता प्राप्त होते. परंतु जर आम्ही आमच्या स्वार्थासाठी पूजा करत असलो तर ती 'सकाम भक्ती' आहे. हे जाणून घेणे अत्यावश्यक आहे की आपल्या सुखाच्या अभिलाषेने युक्त अर्चन—'विशुद्ध अर्चन' नव्हे. अधिकांश गृहस्थ पूजा–अर्चन करतांना म्हणतात—"प्रभू, मी आपल्या समस्त कर्मांची फळे आपल्या चरणी अर्पण करतो." परंतु वास्तवात ते त्यांच्या परिवाराच्या सुखशांतीसाठी असते. आम्ही या कामनांसहित पूजन–अर्चन करू नये. श्रीमद्भागवतील पृथू महाराजांची कथा उचित रूपाने अर्चन करण्याचा विधी आम्हास सांगते.

**'मद्याजी'**चे तात्पर्य आहे—माझे अर्चन करा. अर्चन करणाऱ्याची निष्ठा कशी असायला हवी, याकरिता मी आपल्या अनुभवाची एक गोष्ट सांगतो, जी या मथुरेचीच घटना आहे. जरी अर्चनेची निष्ठासुद्धा साधारणतः संभव नाही, परंतु **'मद्भक्तो भव'**च्या निष्ठेपेक्षा थोडी निम्न स्तरावरील आहे. म्हणून भगवान म्हणतात––जर तुम्ही बिल्वमंगलांसारखे माझे भक्त बनू शकत नसाल, तर माझे अर्चन करा. घटना अशा प्रकारे आहे—मथुरेत एक बाबा रहात होते, जे शाळिग्राम शिळेचे निष्ठापूर्वक अर्चन करीत असत. अर्चन–विधीच्या विभिन्न अंगाचे त्यांना पूर्ण–ज्ञान नव्हते, परंतु जे काही करीत, निष्ठापूर्वक करीत असत. त्यांनी प्रतिज्ञा केली होती की ब्राह्ममुहूर्तात उठून यमुनेत स्नान करून यमुनेच्या पाण्यानेच मी शाळिग्रामाचे अर्चन करीन.

एके वेळची गोष्ट आहे, माघ महिन्यातील अमावस्येची रात्र होती, घनघोर अंधार दाटला होता, त्यातच रात्रभर पाऊस पडत होता, आणि सोसाट्याचा वारा सुटला होता. आकाशात चांदणे नसल्यामुळे त्यांना वेळ काय झाली असावी याचा अंदाज नाही आला आणि ब्राह्म–मुहूर्ताच्या आधीच उठून यमुना स्नानासाठी ते निघाले. यमुनेचे पाणी बर्फासारखे थंड होते. थंडीमुळे त्यांची अवस्था खराब झाली होती, तरीसुद्धा आपल्या नियमाच्या रक्षणासाठी ते यमुनेत स्नान करून ठाकुरजींसाठी पाणी घेऊन निघाले. जेव्हा ते परतत होते तेव्हा दाट काळोख, पाऊस आणि शारीरिक अस्वास्थ्यामुळे त्यांना खूपच त्रास होत होता. त्यांना खूप चिंता वाटू लागली की मी आता घरी जाऊन ठाकुरजींची सेवा कशी करणार? इतक्यात त्यांनी पाहिले की हातात कंदील घेऊन कुणीतरी चालत येत आहे. जेव्हा

ते जवळ गेले तेव्हा पाहिले की ते एक बालक होते. बालकाच्या डोक्यावर पावसापासून बचाव करण्यासाठी घोंगडे होते. अगदी जवळ गेल्यावर बालकाने विचारले, "बाबा! आपण कोठे जाणार?" बाबांनी आपला पत्ता सांगितला, तसे बालक म्हणाले, "मी सुद्धा तिकडेच चाललो आहे, तुम्ही माझ्याबरोबर चला मी तुम्हाला तुमच्या घरापर्यंत सोडतो." बाबा त्या बालकासोबत चालू लागले. चालत चालत कधी घरी आले त्यांना कळलेच नाही. जेव्हा ते घराकडे वळू लागले, तेव्हा त्यांच्या मनात विचार आला की बालकाचे नाव तरी विचारायला हवे. परंतु हे काय! दूर-दूरपर्यंत ते बालक कुठेच दिसत नव्हते! ते तिथेच जडवत् (निर्जीव वस्तूसारखे स्तब्ध) उभे राहिले आणि विचार करू लागले, "अरेरे! माझ्या रक्षणासाठी स्वतः कपटी श्रीकृष्णच बालकाच्या रूपात आले आणि मला चकवून निघून देखील गेले."

हे आहे 'अर्चन', आमचा निश्चय देखील असाच दृढ असायला हवा. आपल्या सुख-दुःखाचा विचार भगवंताच्या सेवेच्या आड येऊ नये. हीच वास्तविक तृष्णा आहे आणि जर आम्ही अशा प्रकारे सतृष्ण (तहानेने व्याकूळ) होऊन अशा प्रेमाने पूजा केली तर भगवान आपला अवश्य स्वीकार करतील. म्हणून कृष्ण म्हणतात- **'प्रयतात्मनः'** (गीता ९.२६). जर कुणी श्रद्धा-प्रेमपूर्वक भगवंतांना निष्कपट रूपाने काही अर्पण केले तर ते त्याचा अवश्य स्वीकार करतात. अशाच प्रकारे गुरुसेवेत जर श्रीगुरुदेव कोण्या चुकीसाठी आमच्यावर रागावत असतील तर आम्ही त्या गोष्टीचा 'पराचा कावळा' करतो आणि विचार करतो, "गुरुजी तर माझ्याप्रती अत्यंत स्नेहशील (प्रेमळ) होते, पण आता माझ्याशी किती कठोर वागत आहेत! मी आता त्यांना सोडून जाईन." आम्ही असा विचार केल्यास तो अत्यंत चुकीचा आहे. आम्ही असा विचार करूच नये. गुरुसेवा करतांना आमच्या समक्ष अनेक बाधा आमची परीक्षा घेण्यासाठी येतात आणि पुढे सुद्धा येतील आणि; परंतु आपला निश्चय दृढ असावयास हवा की जन्मोजन्मी मी माझ्या गुरूंना किंवा प्रभूंना सोडणार नाही.

पूजन आणि अर्चन या विषयी आणखी एक कथा आहे. एक ब्राह्मण होते, जे विग्रह-सेवा करित असत आणि पूजेनंतर दररोज नैवेद्य दाखवीत असत. या कार्याकरिता त्यांना वेतन मिळत असे. वेतन नाही मिळाले तर ते पूजाही करित नसत. अशा अवस्थेत त्यांचे भगवंतावर यथार्थ प्रेम होतेच कोठे? बिहार आणि बंगालमध्ये

असे अनेक व्यवसायिक पुजारी आहेत, जे घरोघरी जातात. जे पूजेच्या बदल्यात शिधा घेतात, जसे तांदूळ, पीठ, डाळ, भाज्या, कपडे इत्यादी. हा सगळा शिधा ते विग्रहांना दाखवितात आणि मग सगळे सामान बांधून आपल्या घरी घेऊन जातात. रोज ते पूजा करण्यासाठी बऱ्याच घरी जातात आणि दिवस समाप्त झाल्यावर आपली कमाई मोजून पाहातात आणि घरी परततात.

हे ब्राह्मणसुद्धा वेतन प्राप्त झाल्यावरच पूजा करित असत. एकदा काही दिवसांकरिता ते नगरातून कुठे बाहेर जाणार होते. त्यांनी अत्यंत स्नेहपूर्वक आपल्या पुत्राला जवळ बोलाविले आणि म्हटले, "माझ्या प्रिय पुत्रा! ठाकुरजींना स्नान करविल्यानंतर दररोज भोग लावित जा (नैवेद्य दाखवित जा)." त्या बालकाला पूजेविषयी काहीच विशेष माहिती नव्हती, परंतु तरीही ते म्हणाले, "ठीक आहे, तुम्ही जसे सांगत आहात, मी तसेच करीन." दुसऱ्या दिवशी त्याची आई चपाती, भाजी इत्यादी बनवित होती, बालकाने ठाकुरजींना गंगाजळाने (गंगेच्या पाण्याने) स्नान करविले, तुलसी–पत्र अर्पण केले आणि सिंहासनावर आसनस्थ केले. नंतर तुळशीपत्र ठेवीत चपाती–भाजीचा असे म्हणत भोग लावू लागले, "ठाकुरजी, आपण आपले भोजन ग्रहण करा, आपण जेवून घ्या, तोपर्यंत मी इथेच उभा राहतो." ते बालक थोडावेळ उभा राहिले. मग उत्सुक होऊन म्हणू लागले, "ठाकुरजी, मी जवळपास अर्ध्या तासांपासून उभा आहे आणि आपल्या थाळीकडे पहातो आहे. परंतु आपण काहीच खात नाही आहात. जेव्हा माझे वडील भोग लावतात (नैवेद्य दाखवतात), आपण तो तीन–चार मिनिटात प्रसन्नतापूर्वक खाऊन टाकता. मी काही मंत्र वगैरे जाणत नाही, म्हणून आपण खात नाही आहात. माझे पिता येथे नाही आहेत, तर काय आपण भुकेले राहणार? जो पर्यंत आपण जेवणार नाही, तो पर्यंत सुद्धा जेवणार नाही." ते बालक अत्यंत प्रेमाने आणि निष्कपटतेने हे बोलत होते. जर हरिनाम जप करतांना अशी भावना आपल्या हृदयात नसेल तर मंत्राचा प्रभाव होत नाही. जर आपण ठाकुरजींची सेवा अशा भावनेने केली नाही तर ते आमची सेवा का स्वीकार करतील? काही वेळ वाट पाहिल्यानंतर बालक म्हणाले, "प्रभू आपण जेवणार नाही का? ठीक आहे, मीसुद्धा काहीही न खातापिता झोपी जातो."

त्यानंतर मात्र भगवंत स्वतःला थांबवू शकले नाहीत. ते आपल्या सिंहासनावरून उतरले आणि खाली येऊन बसले, तसेच

दोन्ही हातांनी जेवू लागले. त्यांनी ताटात काहीही उच्छिष्ट सोडले नाही आणि ते अत्यंत प्रसन्न होते. बालक रिकामी थाळी स्वयंपाकघरात परत घेऊन गेले आणि आईला म्हणाले, "आई, भगवंतांनी जेवण केले! बराच त्रास सहन करून मी त्यांना जेऊ घातले."

बालकाची आई म्हणाली, "'त्यांनी खाल्ले', म्हणायचे काय तुला? चपात्या कुठे आहेत? भाजी कुठे आहे?"

बालक उत्तरले—"त्यांनी खाऊन टाकले."

आईने पुन्हा विचारले—"त्यांनी खाल्ले! हे कसे काय शक्य आहे?"

दुसऱ्या दिवशी बालकाने भगवंतांना पुन्हा त्याच प्रकारे भोजन करविले. त्यानंतरच्या दिवशी ब्राह्मण घरी परतले. त्यांच्या पत्नीने त्यांना सांगितले, "गेल्या दोन रात्रींपासून आम्ही काही न खातापिताच झोपतो आहे."

"का?", ब्राह्मणांनी विचारले.

"ठाकुरजींना जे काही अर्पण केले गेले, ते सगळे त्यांनी खाऊन टाकले."

"ठाकुरजींनी खाल्ले? कसे काय?"

थोडा विचार केल्यानंतर ब्राह्मणांनी आपल्या पुत्राला बोलावून म्हटले. "माझ्या प्रिय मुला! मला असे वाटते की एखादा उंदीर येऊन समस्त भोग (नैवेद्य) खात असणार. उंदीर भगवंताच्या जुन्या सिंहासनाखालीच आपले बीळ बनवून तेथे आरामात रहातात. त्यांना भोजनही सहजासहजी मिळते, त्याचबरोबर दिव्यातले तूपसुद्धा प्यायला मिळते."

बालक हट्ट करीतच म्हणाले, "नाही! ठाकुरजींनीच सगळे खाल्ले."

ब्राह्मण म्हणाले, "छान, छान! आज रात्रीसुद्धा तूच भोग लाव बरे!"

त्या रात्री जेव्हा बालक भोग लावत होते तेव्हा ब्राह्मण जवळच लपून पहात होते की ठाकुरजी खरोखरीच जेवतात की नाही. ते बालक म्हणाले, "प्रभो आपण उशीर का करता आहात? लवकर या आणि नैवेद्य ग्रहण करा." परंतु ठाकुरजी मात्र आपल्या स्थानावरच बसून राहिले. तेव्हा बालक म्हणाले, "प्रभो, आपण जेवत का नाही? आपण का लाजत आहात? असे काय झाले?"

एक कोमल (मृदू) आवाज आला—"आज तुझे वडील लपून बघत आहेत, म्हणून मी येणार नाही."

बालक म्हणाले—"का? आपण अवश्य या आणि भोग ग्रहण करा. जर आपण जेवला नाहीत, तर मी फारच दुःखी होईन."

ठाकुरजी म्हणाले—"जा आणि आपल्या वडिलांना स्पर्श करून ये."

बालकाने तसेच केले. त्याचवेळी बालकाचे काही भाव वडिलांमध्ये प्रकाशित झाले. नंतर ब्राह्मणांनी पाहिले की ठाकुरजी खरोखरीच भोग ग्रहण करित आहेत. पूजा करण्यासाठी अशी भावना असणे आवश्यक आहे. जर अशी भावना आणि श्रद्धा नसेल तर पूजा करण्याचा अधिकार येत नाही. म्हणून श्रीकृष्ण म्हणतात—

**पत्रं पुष्पं फलं तोयं यो मे भक्त्या प्रयच्छति।**
**तदहं भक्त्युपहृतमश्नामि प्रयतात्मनः॥**

*(गीता ९/२६)*

"जे भक्तिपूर्वक मला पत्र (पाने), पुष्प (फुले), फळे, पाणी इत्यादी प्रदान करतात, मी त्या शुद्धचित्त भक्तांद्वारे भक्तिपूर्वक प्रदत्त त्या समस्त वस्तूंना ग्रहण करतो."

अर्जुन म्हणाले—"येथे या युद्धभूमीमध्ये अशा प्रकारचे अर्चन करणे मला संभव होणार नाही. आपण एखादा साधा-सरळ उपाय सांगा."

श्रीकृष्ण म्हणाले—"जर तुम्हाला साधा-सरळ मार्ग हवा असेल, तर 'मां नमस्कुरु'—मला केवळ प्रणाम करा."

केवळ प्रणाम नाही, नमस्काराचा अर्थ आहे—आपल्या अहंकाराचा परित्याग करून प्रणाम निवेदन करणे.

**सर्व धर्मान् परित्यज्य मामेकं शरणं व्रज!**

"समस्त धर्मांचा परित्याग (पूर्णतः त्याग करून) करून केवळ मला शरण या."

हा उपदेश हृदयात धारण करून आम्हाला श्रीकृष्णांना प्रणाम करायला हवा. केवळ मात्र एकदाच अशा प्रकारे प्रणाम करून आम्ही एका झेपेतच हा अथांग भवसागर पार करून जाऊ शकू.

यमराजजी यमदूतांना उपदेश देतात—

**जिव्हा न वक्ति भगवद्गुणनामधेयं**
**चेतश्च न स्मरति तच्चरणारविन्दम्।**
**कृष्णाय नो नमति यच्छिर एकदापि**

**तानानयध्वमसतोऽकृतविष्णुकृत्यान्॥**

(*श्रीमद्भागवत* ६/३/२९)

म्हणजे, "हे दूतगण! ज्यांची जीभ श्रीकृष्णनामाचे कीर्तन करित नाही, ज्यांचे चित्त श्रीकृष्णांच्या पादपद्माचे स्मरण करित नाही, ज्यांचे मस्तक एकदाही श्रीकृष्णांना नमन करित नाही, अशा ‘असत्’ (अभद्र, दुराचारी) लोकांनाच माझ्याकडे घेऊन या, कारण ते कुठल्याही प्रकारचे भक्तीचे कार्य करित नाहीत.”

**दशाश्वमेधि पुनरेति जन्म कृष्ण प्रणामी न पुनर्भवाय।**

“ज्यांनी दहा अश्वमेध यज्ञ केले आहेत, त्यांचा पुनर्जन्म होतो, मात्र ज्यांनी केवळ एकदाच श्रीकृष्णांना प्रणाम केला आहे, त्यांचा पुनर्जन्म होत नाही.”

**सकृत प्रणामी कृष्णस्य मातुस्तन्यम् पिवेन्नहि।**

म्हणजे, जे श्रीकृष्णांना प्रणाम करतात, त्यांना पुन्हा मातेचे स्तनपान करावे लागत नाही.

ज्याने केवळ एकदाच संपूर्ण शरणागतीने श्रीकृष्णांना प्रणाम केला आहे, तो जन्ममृत्यूच्या चक्रातून मुक्त होतो. तो मातेच्या गर्भात प्रवेश करित नाही. हेच ‘मां नमस्कुरु’ चे तात्पर्य आहे.

अर्जुन म्हणाले, “प्रभो, मी आपल्याला केवळ एकदाच नाही, तर शंभरदा प्रणाम केला आहे.”

या श्लोकात श्रीकृष्ण म्हणतात, “‘मद्भक्तो’—माझे भक्त बना. 'मन्मना भव'—आपले मन आणि हृदय माझ्यात तल्लीन करा, माझे भजन करायला सुरुवात करा. त्या भजनानंतर ‘मद् याजी’—माझी पूजा करा आणि पूजा केल्यानंतर मला प्रणाम निवेदन करा.”

या श्लोकात वर्णिलेल्या चार क्रिया एक होऊन जातात. सखोल श्रद्धा, हार्दिक भावना आणि प्रेमपूर्वक भक्तीच्या सर्व अंगांचे याजन (अनुशीलन, पालन) करित भगवान श्रीकृष्णांना नमस्कार करा. हीच सर्व–गुह्यतम संपत्ती, ‘परमं वचः’ म्हणजे गीतेचा सर्वोपरि (सर्वश्रेष्ठ) उपदेश आहे. जर कुणी केवळ याच श्लोकाचे उत्साहाने आणि गांभीर्याने अनुशीलन केले, तर तो निश्चितच भवसागर पार करून श्रीकृष्णाच्या चरणकमलांत प्रेम प्राप्त करू शकेल.

या श्लोकात सूत्र रूपाने व्रजभक्तीच्या प्राप्तीचा उपाय सांगितला गेला आहे, जेथे कृष्णांच्या भगवत्तेचे ‘ईश्वर’ ज्ञान व्रजवासींच्या माधुर्यमयी सेवेच्या सागरात निमज्जित होऊन जाते (बुडून जाते, गढून जाते). व्रजची भक्ती अनुपम आहे. केवळ येथेच श्रीकृष्ण आपल्या भक्तांच्या प्रेमबंधनात बांधले जातात. श्रीमद्भागवतात याचे

विस्तृत रूपाने वर्णन केले गेले आहे.

गीता एक प्रारंभिक ग्रंथ आहे आणि आपण या ग्रंथाचा कुठल्याही प्रकारे अनादर करता कामा नये. यातील उपदेश भक्तिरूपी महालाचा सुदृढ पाया निर्माण करतात.





श्रीभगवान म्हणतात—“जे सर्व जिवांमध्ये मला आणि मला सर्व जिवांमध्ये पाहतात, त्यांच्यासाठी मी अदृश्य नसतो आणि तेसुद्धा माझ्यासाठी अदृश्य नसतात.” (गीता ६/३०) म्हणजे अपरोक्षानुभवी साधकांसाठी भगवान अदृश्य नसतात आणि तसे साधकदेखील भगवंतांसाठी अदृश्य नसतात. अर्थात सर्वदा परस्पर साक्षात्कारामुळे उपासक भ्रष्ट होत नाहीत.

“जे सर्वत्र माझे दर्शन करतात आणि माझ्यातच सर्व वस्तूंचे दर्शन करतात, मी त्यांचाच असतो. म्हणजे शांत–रतीला ओलांडून आम्हा लोकांत (माझ्यात आणि उपासकांमध्ये) ‘मी त्यांचा आहे’ आणि ‘ते माझे आहेत’— अशा प्रकारचे एक संबंधयुक्त प्रेम उत्पन्न होते. असा सबंध उदय झाल्यावर मी त्यांना शुष्क निर्वाणरूप सर्वनाश प्रदान करित नाही. ”—श्रीभक्तिविनोद ठाकूर

# श्रील गुरुदेवांचा संक्षिप्त परिचय



नित्यलीला प्रविष्ट **ॐ विष्णुपाद अष्टोत्तरशत श्रीश्रीमद्भक्तिवेदान्त नारायण गोस्वामी महाराजांचा** शुभ आविर्भाव इसवी सन १९२२ मध्ये बिहार स्थित 'बक्सर' जिल्ह्यातील तिवारीपुर नामक गावात मौनी अमावस्येच्या दिवशी ब्रह्म–मुहूर्तात झाला. यांची आई आणि वडील—हे दोघेही 'श्री–वैष्णव' संप्रदायात दीक्षित वैष्णव होते. सुरुवातीपासूनच बालकाची धर्मात रुची होती. संसारापासून अत्यंत तीव्र वैराग्य झाल्यामुळे यांनी इसवी सन १९४६ मध्ये मूळ श्रीचैतन्य मठ आणि अन्यान्य सर्व मठांचे संस्थापक–आचार्य नित्यलीलाप्रविष्ट **ॐ विष्णुपाद श्रीश्रीलभक्तिसिद्धान्त सरस्वती ठाकूर 'प्रभुपाद'** यांचे अंतरंग प्रिय पार्षद नित्यलीलाप्रविष्ट **ॐ विष्णुपाद श्रीश्रीलभक्तिप्रज्ञान केशव गोस्वामी महाराजांकडून** विधिवत दीक्षा प्राप्त केली.

आपल्या गुरुजींसोबत यांना भारतातील जवळपास सर्व

तीर्थांची यात्रा करण्याचे सौभाग्य प्राप्त झाले. सर्व स्थानांवर गुरुजींची हरिकथा ऐकून यांनी त्यांच्या विचारांना गंभीरतापूर्वक आत्मसात केले. सन १९५२ मध्ये यांनी श्रीश्रीलभक्तिप्रज्ञान गोस्वामी महाराजांकडून संन्यास ग्रहण केला. काही काळ पश्चात गुरुजींनी यांना हिंदी भाषिक क्षेत्रात श्रीचैतन्य महाप्रभूंच्या वाणीचा प्रचार करण्यासाठी श्रीकेशवजी गौडीय मठ, मथुरेच्या संचालकाच्या रूपात नियुक्त केले.

येथून त्यांनी गुरुजींची आज्ञा आणि कृपेने श्रीभागवत पत्रिकेचे संपादन (संपादकीय कार्य) आरंभ केले. तसेच जैवधर्म, भक्ति–रसामृत–सिन्धु–बिन्दू, राग–वर्त्म–चन्द्रिका, सत्–क्रिया–सार दीपिका, भागवतामृत–कणा, व्रजमण्डल–परिक्रमा, नवद्वीप–धाम–परिक्रमा आणि अन्यान्य बंगाली भाषेत रचित अनेक श्रीगौडीय–वैष्णव–धर्माच्या संबंधित साहित्याचे हिंदी भाषेत अनुवाद कार्य आरंभ केले. ज्यांचा आता इंग्रजी, स्पॅनिश, डच, फ्रेंच, जर्मन, रशियन, इटालियन, पोर्तुगीज, चिनी इत्यादी विश्वातील अनेक भाषांमध्ये अनुवाद होतो आहे.

अनेक सुयोग्य ब्रह्मचारी भक्तांना त्यांनी संन्यास दीक्षा प्रदान करून त्यांना प्रचार कार्यात रत केले आहे. साऱ्या भारतभर आणि भारताच्या बाहेर अमेरिका, ब्राझिल, इंग्लंड, फ्रांस, बेल्जियम, हॉलंड, इटली, स्पेन, कॅनडा, रशिया, मेक्सिको, कॉस्टा रिका, ऑस्ट्रेलिया, इंडोनेशिया, मलेशिया, फिजी, न्यूझीलंड, जपान, चीन आणि हवाई (होनोलूलू) इत्यादी विश्वातील छोट्या–मोठ्या देशांमध्ये त्यांनी स्वतः प्रचार केला. सध्या त्यांचे शिष्य संपूर्ण विश्वात शुद्ध–भक्तीचा प्रचार करीत आहेत. सन २०१० मध्ये श्रीजगन्नाथ–पुरी–धामात त्यांनी समाधी घेतली. त्यांनी **'ईस्कॉन (आंतरराष्ट्रीय श्रीकृष्ण–भावनामृत–संघ, International Society of Krishna Consciousness)'** चे संस्थापक–आचार्य नित्यलीलाप्रविष्ट **ॐ विष्णुपाद श्रीश्रीमद् भक्तिवेदान्त स्वामी महाराजांची** प्रचुर सेवा केली.



**हरे कृष्ण हरे कृष्ण**
**कृष्ण कृष्ण हरे हरे।**
**हरे राम हरे राम**
**राम राम हरे हरे॥**

# डॉ. श्रीपाद भक्तिवेदान्त दंडी महाराजांचा परिचय



श्रीपाद भक्तिवेदान्त दंडी महाराज जगद्गुरू युगाचार्य नित्यलीला प्रविष्ट ॐ विष्णुपाद अष्टोत्तरशत श्रीश्रीमद् भक्तिवेदान्त नारायण गोस्वामी महाराजांचे संन्यासी शिष्य आहेत. आपले शिक्षण बीएस्सी (सन्मानपूर्वक पदवी), बॅचलर ऑफ इंजिनियरींग (भारतीय विज्ञान संस्थान, बेंगळुरू), मास्टर ऑफ सायन्स (भारतीय प्राद्यौगिकी संस्थान, मद्रास), डॉक्टर ऑफ सायन्स (वॉशिंग्टन विश्वविद्यालय, अमेरिका), सीआयएसएसपी (प्रमाणित माहिती प्रणाली सुरक्षा व्यावसायिक), पीई इतके झाले आहे. आपण पूर्वी अमेरिकेतील जगप्रसिद्ध 'नासा' (राष्ट्रीय वैमानिक आणि अंतरिक्ष प्रशासन) या संस्थेत संगणक सुरक्षा वैज्ञानिक म्हणून कार्यरत होता. तसेच काही काळ सिटी यूनिवर्सिटी ऑफ न्यूयॉर्क मध्ये प्राध्यापक म्हणून आपण सेवारत होते. अमेरिकेत आपल्या नावे अनेक Research Patents (नव्या शोधांच्या पूर्ण अधिकारांची) नोंद झाली आहे.

आपण अमेरिका, सिंगापूर, मलेशिया, दक्षिण आफ्रिका, केनिया, त्रिनिदाद, चीन, तैवान, ब्राझिल इत्यादी देशांमध्ये शुद्ध भक्तीचा प्रचार करित आहात. आपण शाकाहारासंबंधी इंग्रजी भाषेत एक ग्रंथ लिहिला आहे—"Vegetarianism—a scientifically proven

and time honored path to peace” (शाकाहार-वैज्ञानिकदृष्ट्या सिद्ध झालेला शांतीचा प्राचीन सन्मानित मार्ग).

श्रील गुरुदेवांच्या आदेशानुसार श्रीरंगनाथ गौडीय मठ, हेसरकट्टा, बंगळूर द्वारा कन्नड भाषेत श्रीवैष्णव-सिद्धान्त-माला, श्रीमाधुर्य-कादंबिनी, श्रीजैवधर्म, श्रीचैतन्य महाप्रभूंचे स्वयं-भगवत्ता-प्रतिपादक काही शास्त्रीय-प्रमाण इत्यादी ग्रंथांचे प्रकाशन करण्यात आले आहे. श्रीपाद भक्तिवेदान्त दंडी स्वामी महाराजांच्या पुढाकाराने श्रील गुरुदेवांच्या ग्रंथांचे प्रकाशन मराठी, तेलुगू, तामिळ, मल्याळम, बंगाली, स्पॅनिश भाषांमध्ये देखील अव्याहतपणे जारी आहे.

छोट्या बालकांच्या शाश्वत कल्याणासाठी आणि त्यांना भक्तीचे संस्कार प्रदान करण्यासाठी बंगळूर येथे आपण श्रीरंगनाथ गौडीय मठ गुरूकुलाची स्थापना केली. या गुरूकुलात मुलांना मोफत शिक्षण, भोजन, राहाण्याची व्यवस्था, वैद्यकीय उपचार इत्यादी देण्यात येतात. त्यांना भगवद्गीता-अध्ययन, हरिनाम-संकीर्तन, एकादशीचा उपवास, गुरुपुजा इत्यादी करण्यास शिकविले जाते. पूज्यपाद श्रीपाद भक्तिवेदान्त दंडी महाराज सर्वांना निर्जल एकादशी व्रत करण्याची प्रेरणा देतात. प्रत्येक दशमीला ते फोन वरून एकादशीच्या माहात्म्याबद्दल प्रवचन देतात.

आपण एक निष्कपट व निःस्पृह गोमातेचे सेवक आहात. आपल्या बंगळूर येथील श्रीरंगनाथ गौडीय मठात ६० पेक्षाही अधिक भारतीय प्रजातीच्या गायी, वासरे आणि वळूंची सेवा आणि संवर्धन होते आहे.





# शब्दकोश

**अइता किंवा अळइता**—जो लाल रंग सौभाग्यवती महिला आपल्या चरणांना लावतात

**अहैतुकी कृपा**—काहीही निमित्त नसलेली कृपा

**अक्षौहिणी**—२१,८७० रथ, २१,८७० हत्ती, १०९,६५० पायदळ सैनिक आणि ६५,६०० घोडदळातील सैनिकांच्या एका तुकडीला 'अक्षौहिणी' म्हणतात.

**कुपथ्य**—स्वास्थ्याला हानिकारक ठरणारा आहार विहार

**भगवदवतार**—भगवंतांचे अवतारांनी

**श्रृंग**—म्हशीच्या शिंगापासून बनविलेले एक वाद्य

**रासपंचाध्यायी**—श्रीकृष्ण व श्रीमती राधिका आदी गोपींच्या रास–लीलेचे वर्णन करणारे दहाव्या स्कंधातील २९ ते ३३ असे पाच अध्याय





ज्यांची बुद्धी परमेश्वरात निविष्ट आहे, ज्यांचे मन केवळ त्यांच्याच ध्यानात मग्न आहे, ज्यांची समस्त अविद्या विद्येद्वारे नष्ट होऊन चुकली आहे, ते अपुनरावृत्तिरूप मोक्षाला प्राप्त होतात. ज्ञानिगण विद्या–विनयाने संपन्न ब्राह्मण, चांडाळ, गाय, हत्ती आणि कुत्र्यात सुद्धा समदर्शी असतात

## श्रीमद्भगवद्गीता पूर्णरूपाने शुद्धभक्ति–शास्त्र आहे

सत्यप्रतिज्ञ परम कारुणिक (दयावंत) भगवान श्रीकृष्णचंद्रांनी आपला सखा अर्जुनांना लक्ष्य करून जगाच्या उद्धारासाठी एकमात्र उपायस्वरूप सर्व–वेद–सारार्थ–मीमांसारूप श्रीमद्भगवगद्गीता शास्त्राला प्रकाशित केले आहे.

म्हणून गीता–शास्त्र साऱ्या उपनिषदांचे शिरोभूषणस्वरूप आहे. उपनिषद–समूह, ब्रह्मसूत्र आणि श्रीमद्भगवद्गीता पूर्णरूपाने शुद्धभक्ति –शास्त्र आहेत. ब्रह्मस्वभाव–संपन्न व्यक्ती गीता–शास्त्राचे श्रवण करून उद्धवाप्रमाणे प्रव्रज्या (संन्यास) ग्रहण करतील. गीतेचे गूढ तात्पर्य हे आहे की ज्या व्यक्तीचा जसा स्वभाव आहे, त्याच्या अनुरूप त्याचा अधिकार असतो. अधिकाराला सोडून बद्ध–जिवासाठी तत्त्ववस्तू प्राप्त करण्याची कोणतीही संभावना नाही आहे. कर्म, ज्ञान आणि भक्तीचे वेगवेगळे स्वभाव आहेत. म्हणून त्यांचे स्वरूप देखील वेगवेगळे आहेत. म्हणून तत्त्वविचाराद्वारे कर्मकांड, ज्ञानकांड आणि भक्तीला वेगळे केले गेले आहे. साऱ्या अवांतर फळांना पार करून जेव्हा भगवत्–सेवा–सुख परिलक्षित होते (स्पष्टपणे दिसते), तेव्हा कर्म भक्तीच्या रूपात परिवर्तीत होऊन जाते. म्हणून भक्तीच जिवाच्या कर्म आणि कर्मफळाचे चरम उद्देश्य आहे. भक्ती अत्यंत गूढ आहे. ती कर्म आणि ज्ञान दोघांची जीवन–स्वरूपा आणि अर्थसाधिका आहे. म्हणून भक्तिविषयक विचाराला गीतेच्या मध्यस्थित सहा अध्यायांमध्ये सन्निविष्ट केले गेले आहे. अशा प्रकारे विशुद्ध भक्तीच गीतेचे चरम उद्देश्य आहे. गीतेच्या शेवटी 'सर्वधर्मान् परित्यज्य' श्लोकाच्या द्वारे हे प्रतिपादित झाले आहे की भगवंतांच्या प्रती शरणागतीच सर्वगुह्यतम उपदेश आहे.

श्रीमद्भगवद्गीतेच्या शुभारंभापासून परिसमाप्ती पर्यंत संपूर्ण ग्रंथाचे तत्त्व–सिद्धान्त आणि यथार्थ शिकवणीला जाणण्यासाठी आम्हाला सर्वात आधी श्रीरूपानुग गौडीय वैष्णवाचार्य गुरुवर्गाला शरणागत जावे लागेल. म्हणून लोकोत्तर नित्यसिद्ध महापुरुषांची भ्रम, प्रमाद आदी दोषरहित शुद्ध वाणी आणि शिकवणच आमच्या साठी एकमात्र ग्रहण करण्यायोग्य आहे.

| | |
|---|---|
| <br>श्रीगौडीयाचार्यकेशरी नित्यलीलाप्रविष्ट ॐ विष्णुपाद अष्टोत्तरशत श्रीश्रीमद्भक्तिप्रज्ञान केशव गोस्वामी महाराज (मधे बसलेले), श्रील भक्तिवेदान्त स्वामी महाराज (त्यांच्या डावीकडे) आणि श्रील भक्तिवेदान्त मुनी महाराज | <br>परमाराध्यतम युगाचार्य गुरूदेव नित्यलीला प्रविष्ट ॐ विष्णुपाद परमहंस परिव्राजकाचार्य अष्टोत्तरशत श्रीश्रीमद्भक्तिवेदान्त नारायण गोस्वामी महाराज. या पुस्तकाचे लेखक व जगप्रसिद्ध शुद्ध भक्तीचे प्रचारक. श्रील भक्तिवेदान्त स्वामी महाराजांचे जिवलग मित्र. |

पूत सलिला (पवित्र पाणी असणाऱ्या) भगवती गंगेच्या तटस्थित (काठावर असणारे) कडुलिंब, आंबा, चिंच आणि बेल इत्यादी वृक्ष एकाच पाण्याला ग्रहण करून विभिन्न प्रकारचे आंबट, गोड आणि कडू फळे प्रदान करतात. तसेच दैवी मायेने मुग्ध झालेले जीव आपापल्या स्वभावानुसार एकच शास्त्र अध्ययन करून देखील वेगवेगळया मतांचा प्रचार करतात. जर असे म्हटले गेले की कर्म, योग आदी श्रेष्ठ साधने नाही आहेत, तेव्हा भगवंतांनी आपला प्रियसखा (प्रिय मित्र) अर्जुनाला या सर्वांचा अभ्यास करण्यासाठी का उपदेश प्रदान केला, तर उत्तर हे आहे की श्रीकृष्णांनी त्याजागी हे पण सांगितले आहे की भगवद्भक्तीच्या विना कर्म, ज्ञान आणि योगाच्या कृती (उद्यम, प्रयास) निष्फळ आणि निरर्थक आहेत. श्रीचैतन्य महाप्रभूंनी व्रजगोपींच्या आनुगत्यात सर्वश्रेष्ठ भजनाचा उपदेश दिला आहे. 'ऐश्वर्य शिथिल प्रेमे नाहि मोरे प्रीत' (ऐश्वर्य-भावाने शिथिल झालेले प्रेम श्रीकृष्णांना संतुष्ट करू शकत नाही)—हाच त्यांच्या अंतर्निहित उद्देश आहे. सर्वावतारी श्रीकृष्णांनी 'सर्वधर्मान् परित्यज्य मामेकं शरणं व्रज' श्लोकात आपले मायाधीशत्व, देवदेवेशत्व आणि सर्वाराध्य परम भजनीयत्वाचा प्रकाश आणि प्रचार केला आहे. ते ज्ञानींचे आराध्य निर्विशेष ब्रह्माचे प्रतिष्ठा किंवा आश्रय आहेत. ते अद्वयज्ञान-तत्त्व आणि अद्वितीय वास्तव-वस्तू आहेत. ते सर्वाराध्य स्वरूपात अखिल-रसामृतमूर्ती परतत्त्व आहेत.